# रानफुलें.

[ बॅ. सावरकरांची अंदमानांतील कविता. ]



—प्रकाशक—

ग. वि. दामले, रत्नागिरी.



—मुद्रक—

स. प. देसाई, 'बलवंत मुद्रणालय' रत्नागिरी.



संकलित आवृत्ति १ ली.

मे १९३४.



मूल्य २ रुपये.

# अनुक्रमणिका.

—— × ——


| विषय. | | पृष्ठें. |
| --- | --- | --- |
| परडी १ | कमला— | १ ते ४५ |
| परडी २ | विरहोच्छ्वास— | ४७ ते ७९ |
| परडी ३ | मूर्ति दुजी ती !— | ८१ ते १०४ |
| परडी ४ | सप्तर्षि— | १०५ ते १३२ |
| परडी ५ | मृत्युशय्येवर<br>हिंदुनृसिंह<br>जगन्नाथाचा रथ<br>अनंताची आरती | १३३ ते १५२ |
| परिशिष्ट— | वैनायकवृत्त ( निबंध ) | १५५ ते १६२ |




# प्रस्तावना.

—००❀००—

गीतारहस्य बाला ॥
" कमला " विनायकाला ॥
दे स्फूर्ति गावयाला ॥
ती धन्य बंदिशाला ! ॥

' आशागीत. '
( श्री. पाठक अेम्. अे. कृत. )

विख्यात कर्मवीर आणि कवी बॅ. सावरकर यांच्या कांहीं कवितांचे प्रकाशक होण्याची संधि आज मला लाभावी हें मी माझें अेक सुकृतच समजतों.

बॅ. सावरकरांच्या अनेक कविता मागेंच जप्त झालेल्या आहेत. त्या पुन्ह प्रकाशिणें आज तरी अशक्य आहे.

त्या जप्त झालेल्या कविता वगळून त्यांच्या अुरलेल्या अप्रकाशित कवितांचा संग्रह प्रसिद्ध करण्याचा संकल्प पुण्याच्या गणेश मुद्रणालयाचे श्री. गोखले यानीं आधींच सोडलेला आहे.

परंतु सावरकरांची ती जप्त आणि अप्रकाशित कविता वगळली तरीहि त्यांच्या ज्या कांहीं कविता मध्यंतरी " रानफुले " या नांवानें प्रकाशिल्या गेल्या त्याही आतां दुर्मिळ झाल्या असल्यानें त्याची दुसरी आवृत्ति निघावयास हवी होती. यास्तव तेंच काम मी अंगावर घेण्याचें ठरवून त्यांचा हा संग्रह प्रकाशीत आहे. त्यात त्या पूर्वप्रकाशित ' रानफुलां ' सहच त्याच ' रानांतील ' आणखी कांहीं फुलेंही वेंचून मी या परड्यांत घातलीं आहेत.

ज्यावेळीं ही रानफुलें सन १९२३--२४ मध्यें प्रथम प्रकाशित झालीं तेव्हांच अनेक रसिकांच्या तोंडून अुद्गार निघाले कीं " जर असलीं फुलें रानांत फुलत असतील तर खरोखरच ' दूरीकृता खलु गुणैरुद्यानलता वनलताभिः ! ' ह्यांस रानफुलें असें न म्हणतां पारिजात फुलेंच म्हणणें अुचित ! "

पण तरीहि ह्या संग्रहास रानफुलें हेंच नांव चालू ठेवणें मला इष्ट वाटलें. अशासाठीं कीं तें नांव केवळ कवीचा औपचारिक विनय प्रदर्शविणारें नसून ह्या कवितांच्या कुळकथेचीच आठवण देणारें आहे. कारण ह्या कविता, हीं फुलें, खरोखरच अेका हिंस्र, निबिड नि अंधःकारमय ' रानांत ', अंदमानच्या काळकोठडींत, अुगवलीं–अुमललीं ! यांची ती कुळ कथा अशी.

सन १९११ त जन्मठेपेची शिक्षा होअून अंदमानांत धाडलें गेल्यानंतर तेथील बंदीगृहांत बॅ. सावरकरांस प्रथम वर्षेनवर्षें भयाण अेकांतवासांतच नुसतें खिचपत पडावें लागलें. त्या निष्क्रिय नी अवश अंधारांतही आपल्या राष्ट्रीय व्रतास पोषक असें कोणचें कार्य करतां येअील याचा मनाशीं विचार करता त्यांस अेकच वाट काय ती गवसूं शकली. लहानपणापासून पानपतच्या युद्धावर अेक महाकाव्य लिहावें अशी त्यांची लालसा असे. पण कृतीवांचून कविता काय कामाची हेंच ज्या सावरकरांसारख्या कर्मवीराचें ब्रीद त्यांस ते मोकळे होते तों प्रत्यक्ष कार्याच्या रणधाअींत बैठी कविता करण्यास कुठला वेळ सापडणार, कसलें रुचणार ! पण बंदीगृहांतील निष्क्रियतेच्या बेड्यांनीं जखडून पडलेल्या अवस्थेंत मात्र तशी कविताच अेक कृति होअून बसली. कार्य असें तिथें तेवढेंच शक्य होतें. यास्तव त्यानीं निश्चयच केला तें पानपतचें राष्ट्रीय महाकाव्य लिहिण्याचा,—— नव्हे, रचण्याचा.

कारण कविता लिहिण्यास तेथें कागद व पेन्सिलमुद्धां नव्हती. काळ्यापाण्यावर लिहिणें हाच अेक नीच अपराध समजला जाअी. यास्तव कविता मनांत रचाव्या; जमल्यास अेकाद्या काट्यानें वा खापरीच्या चिचोळ्या तुकड्यानें पहारेकऱ्याचा डोळा चुकवून सफेती दिलेल्या त्या भिंतीवर कोरून ठेवाव्या; हळु हळु पाठ झाल्या कीं खरडून टाकाव्या. वर्षाकाठीं पुन्हां सफेती दिली कीं त्या भिंतीच्या कोऱ्या कागदाचा नवा पुरवठा अनायासेंच होअी. पण दोन तीन वर्षांतच तें बिंग फुटलें आणि त्या भिंतीच्या कागदांचें थकलेलें सारें मोल चोपून अुकळण्यांत आलें. कारण भिंतीवर कांहींतरी कोरून लिहिलेलें असतें हें पहारेकऱ्यांच्या ध्यानांत पुढें पुढें येअूं लागलें नी त्या अपराधासाठीं मधूनच कधीं तरी आमच्या कविवरांना आठ आठ दिवस हातकडींत टांगून अुभें राहण्याची शिक्षा भोगावी लागे. ह्या शिक्षेंत हात टांगलेले असल्यामुळें सक्तीचें हातकाम अर्थातच सुटतें. त्यामुळें ती शिक्षाच सुटी

समजून तिचाही मागच्या पाठ केलेल्या हजारों कवितांची अुभ्या अुभ्या आवर्तनें करून त्या ताज्या ठेवण्याचे कामीं अुपयोग करून घेण्यात येअी! पाचअेक वर्षांनीं अंदमानातही संघ–शुद्धी–शिक्षणप्रचार–संघटनादिक चळवळी चालविण्याची शक्यता अुत्पन्न होतांच बॅरिस्टर महाशयांचा मोर्चा पुन्हा प्रत्यक्ष कार्याकडे वळला. काम निघतांच कविता पुन्हा मागें पडली!

परंतु जी झाली ती चांगली सहा हजाराचें आंत बाहेर होती. तिला ग्रंथागारात नसलें तरी अधून मधून आवर्तनें करीत पाठागारात जतन करून ठेवण्याचा त्यांनीं यत्नही केला. पण ग्रंथागारास जशी कसर तशी पाठागारास विसर. ती कीड, लागावयाचें कांहीं चुकलें नाहीं. तिच्या अुपद्रवातून जी कविता अुरली तींत पानपत काव्याचें कांहीं त्रुटित सर्ग होते. त्यांपैकीं 'महासागर' प्रभृति काही सर्ग अजूनही पडून आहेत. 'गोमातक' नावाचा अेक सर्ग स्वतंत्र खंडकाव्याचे रूपानें श्री. ग. म. वीरकर यांनीं सन १९२४ त प्रकाशिला. आणि 'कमला' नी 'विरहोच्छ्वास' ह्या दोन सर्गांची पहिली आवृत्ति सन १९२३ त प्रसिद्धिली होती आणि दुसरी आवृत्ति ह्या संग्रहात प्रसिद्धीत आहेत.

ह्या कविता स्वतंत्र खंडकाव्यांचे रूपानें जेव्हां प्रसिद्ध झाल्या तेव्हां बॅ. सावरकर सुटले नसल्यानें त्याचे नावे त्या प्रकाशितां आल्या नाहींत. महाराष्ट्र भाट, विजनवासी, अशी टोपण नांवेंच योजण्यांत आलीं. अर्थातच ती कविता आपल्या विख्यात जनकाच्या नावाच्या वाशिल्यावाचून साहित्य जगतात प्रवेशल्यामुळें अेखाद्या अनाथ, अनोळखी कन्येसारखी तिची, व्हावी तशी विचारपूस फारशी झाली नाहीं. पण ज्यानीं ती केली त्याच्या मनात ती अितकी भरली की तिचा त्यांस पुन्हां विसर म्हणून पडेना. तिच्यानंतर जन्मास आलेल्या महाराष्ट्र कवितेवरही तिच्या चालचलणुकीची आणि हावभावाची छाप पडलेली येता जाता आढळून येते.

हीं रानफुलें छापताना लिपिशुद्धीच्या प्रचारासही सहाय व्हावें म्हणून सर्वत्र "अ" ची बाराखडीच वापरली आहे आणि कविताचे परिचय नी मुखपृष्ठें तर संपूर्णतः शुद्ध लिपीच्या सुधारलेल्या टंकांतच छापलीं आहेत.

पायटीपाची सोय कोणास हवी असते, कोणास नको असते. त्या नच दिल्या तर ती सोय हवी असते त्याना अगदींच अडचण पडते. पण त्या दिल्या

म्हणजे हव्या त्यानें वाचाव्या, नको त्यानें त्या बघून नयेत अशी दोन्हींचीही सोय होते. यास्तव पायटीपा दिल्या आहेत.

ह्या " रानफुलां " तील बहुतेक कविता सुपरिचित अशा अनुष्टुप प्रभृति वृत्तांतच आहेत. पण दोन कविता " वैनायक " नांवाच्या नवीन वृत्तांत आहेत.

**वैनायक वृत्ताची चाल:**—कोणचाही गाण्यासारखा गळा न लावतां, ऱ्हस्व दीर्घ अक्षराचा यथावत् स्पष्ट उच्चार करीत, प्रत्येक ओळीच्या शेवटीं स्वल्पविरामाऐवतकें किंचित थांबून, विरामचिन्हांप्रमाणें स्वल्प वा अर्धविराम घेत, वाक्य संपेल तिथें पूर्णविराम घ्यावा. गद्याप्रमाणें अर्थानुरोधें स्वर पालटीत पण ताल सुटूं न देतां वाचीत गेलें असतां, जर रचना कुशलपणें केलेली असली तर कोणच्याही पद्यबंधाचा जो विशेष तो सुरेलपणा आणि ती श्रुतिमंजुलता ह्या वृत्तातही आपोआप प्रतीत होऊं लागेल. कोणच्याही वृत्तास लावूंच म्हटलें तर कोणत्या तरी पदाची अथवा गाण्याची चाल बहुधा लागूं शकेल. तशा कित्येक चाली यासही लागतील. पण त्यांतील रसव्यक्ति यथावत् प्रकटविणारा त्याचा विशेष म्हणजे तें वृत्त गेय नसून पाठ्य आहे, नुसतें वाचावयाचें आहे, हाच असल्यानें त्यास कोणचाही गळा वा ' चाल ' न लावताच वाचलें पाहिजे. ' चाल ' नसणें हीच त्याची खरी चाल.

**वैनायक वृत्ताचा नियम:**—हें मात्रावृत्त, सहा मात्रांचे तीन चरणक आणि शेवटीं अेक गुरु अक्षर मिळून वीस मात्रांचे प्रत्येक चरण होतें. ह्याचा पद्यबंध समचरणी असतो. पण नाट्य काव्यांत किंवा संवादकाव्यांत, चरणकांच्या अनुरोधें चरण तोडून विषमचरणांची सोयही, सुरेलपणा न भंगवितां, त्यांत सहज साधतां येते. ओळीच्या शेवटीं यमक असलाच पाहिजे असा नियम नाहीं. पण विचारव्यक्तीस किंवा भावव्यक्तीस अवश्य वाटेल तर यमकाची गोडीहि त्यांत आणतां येते. यति बाराव्या मात्रेवर असतो.

**वैनायकवृत्ताचा अितिहास:**—बॅ. सावरकर हे कॉलेजांत असतांना मिल्टनचे आणि शेक्स्पीअरचे ग्रंथ त्यांना फार आवडूं लागले. तेव्हांपासूनच सुदीर्घकाव्यरचनेस कित्येक दृष्टीनें अिंग्लिश Blank verse ह्या वृत्तासारखें विशेष अनुकूल असलेलें अेखादें मराठी वृत्त शोधून काढावें असें त्यास वाटे. त्यानंतर व्हिट्मन, कारपेंटर, प्रभृतींची कविता आणि Free

verse प्रभृति त्या Blank verse चीच रूपांतरित वृत्तें हींहि त्यांनीं अभ्यासिलीं. आपल्या जुन्या वृत्तांची सरणी आणि त्यांत असलेले सौष्ठव शक्यतों सुटूं न देतां वरील अिंग्रजी वृत्तांचे गुणही ज्यात आणतां येतील असें वृत्त घडण्याचे बरेच प्रयोग करीत करीत शेवटीं अंदमानमध्यें सन १९१३ चे आगेमागें त्यांनीं वैनायक वृत्ताची घडण ठरविली. मध्यंतरीं बंगाली काव्याचाही व्यासंग त्यांस घडल्यामुळें अिंग्लिश Blank verse चे मधुसूदनदत्त या प्रख्यात बंगाली कवीनें पूर्वींच अनुकरण करून मेघनाद वध काव्यांत योजलेल्या " अमित्राक्षर " छंदाशींहि त्यांचा परिचय झाला. त्याचेंही अवश्य तें सहाय त्यांनीं वैनायकवृत्ताची सरणी ठरवितांना घेतलें. सन १९१४ पासून त्यांनीं आपल्या गोमांतक काव्याचा अुत्तरार्ध ह्या वृत्तांत रचण्यास आरंभ केला. अितरही अनेक स्फुट कविता त्यांत अंदमानमध्यें असतांना रचल्या. त्यांपैकीं " गोमांतक " काव्य महाराष्ट्र भाट ह्या टोपण नांवानें सन १९२४ मध्यें बॅ. सावरकर सुटण्याचे संधीसच त्याचे बंधूंनीं प्रसिद्धिलें. वीर बैरागी ह्या पुस्तकांत त्यांची " वीरवरः श्रीबंदा " ही ह्या वृत्तांतील आणखी अेक स्फुट कविताही प्रसिद्ध झाली. ते सुटल्यानंतर हें वृत्त मराठी नाट्य संवादांतही अिंग्लिश वा बंगाली नाटकाप्रमाणें योजण्याचा अुपक्रम त्यांनीं अुःशाप ह्या नाटकांत केला. नाट्यकला प्रवर्तक मंडळीस ह्या वृत्ताची शिकवण स्वतः बॅ. सावरकर यांनींच दिल्यानें त्या मंडळींनीं अभिनयिलेल्या अुःशापांत ह्या वृत्ताचा नाट्यप्रयोग फारच अुठावदार आणि यशस्वी होअी. संन्यस्त खड्ग आणि अुत्तरक्रिया या नाटकांतही वानगीसाठीं ह्मणून हे वृत्त योजलेलें आहे. पण त्यांस अभिनयिणाऱ्या नाटक मंडळ्यांना बॅ. सावरकरांच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं तें बसवितां न आल्यानें त्या नाट्यप्रयोगांतून तें अद्याप वठवितां आलें नाहीं.

ह्या वृत्ताची पहिली प्रसिद्धी जरी अगदीं तुटपुंजी होती, अेका टोपण नांवाखालीं, कांहींच गाजावाजा नसलेली; तरी गोमांतक काव्याचे निमित्तें ह्या वृत्ताचीही चर्चा बऱ्याच नियतकालिकांतून होअूं लागली, आणि अशा वृत्ताची आवश्यकता वाटत असलेला वाचक आणि लेखक वर्गही हळुहळु प्रकट होअूं लागला. विशेषतः नागपूरच्या सुप्रसिद्ध ' वागीश्वरी " मासिकांतून अशा " मुक्तबंध " पद्धतिविषयीं कांहीं विद्वानांनीं जे निबंध लिहिले आहेत

आणि आपापले प्रयोग अुल्लेखिले आहेत, ते सारेच विचारार्ह नी मार्मिक आहेत. त्यांतील बहुतेकांनीं या वैनायक वृत्तास त्याच्या मौलिकते (originality) विषयीं किती मनःपूर्वक गौरविलें आहे तें त्यांच्या लेखांतील खालील वानगीदाखल दिलेल्या कांहीं त्रुटक वाक्यांवरून वाचकांच्या ध्यानांत येअीलच. " Blank verse चे धर्तीवर पद्यरचनेचे शिंग फुंकण्याचा पहिला जोरदार प्रयत्न बॅ. सावरकर यांनीं आपल्या गोमांतक काव्यांत केला. " " मुक्तछंद निर्मितीचा प्रथम प्रयत्न ह्मणून वैनायक वृत्तांचें महत्त्व फार आहे. " " मराठी कवितेंत ही बंडखोरी बुद्धिपुरस्सर करणारे बॅ. सावरकर हेच पहिले बंडणमिश्र होत ! " अित्यादि.

**ह्या वृत्ताचें नांव:** वैनायक हें नांव ह्या वृत्ताला अशासाठीं दिलें की त्या शब्दानें जसा त्याच्या गुणाविशेषाचा तसाच त्याच्या योजकाचे नांवाचाही अुल्लेख होअू शकतो. आपल्या पूर्वपरिचित अशा अनेक सुंदर वृत्तांच्या, अनेक सुरेल पक्ष्यांप्रमाणें असलेल्या, चिमुकल्या चरणचालींपेक्षां ह्या वृत्ताची झेप आणि भरारी विनायकाच्या ( गरुडाच्या ) झेपेसारखी विशाल असते ह्मणून आणि याच्या योजकाचें नांवही विनायक ह्मणून यास 'वैनायक' असें अभिधानिलें.

या वृत्तविषयींची सोपपत्तिक चर्चा हवी असलेल्या जिज्ञासूंचे सोयीसाठीं स्वतः बॅ. सावरकरांनींच लिहिलेला " वैनायक वृत्ताचा विशेष " हा स्वतंत्र निबंध या पुस्तकाचे परिशिष्टांत दिला आहे.

रत्नागिरी.<br>ता. १ अेप्रिल १९३४ } ग. वि. दामले.



कर्मवीर

# बॅ. सावरकर.



होते सगळे निजले तेव्हां राहुनिया जागा । धीर! ।
अंधःकारीं तूं आशेचा शोधिलासि धागा ॥ १ ॥
पतनोन्मुख ह्या हिंदु जातीशी कर हा सांवारिता । जयाचा ।
सावरकर हो अभिधा त्या तव पावे सार्थकता ॥ २ ॥
वक्ता, विद्वान, लेखक, कविवर, वीर, हुतात्मा तूं । विनायक ।
अभिनव भारत मनोरथांचा मूर्त दिव्य केतु ! ॥ ३ ॥

"केसरी" ता. ८।११।३०

# रानफुलें—परडी १ ली.

# कमला.

**( पानपतच्या कालांतील अेक कथानक )**

( अपूर्ण )

“ नृशंसक गुहांच्या अंधुक अुजेडांत अेखाद्या संगत काव्याची माळ पूजेसाठीं गुंफावी म्हणून अेकत्र केलेली हीं रान फुलें व पानें, त्या माळेचा योग अजूनही दुर्घटच दिसत असल्यामुळें, तशींच विखुरल्या विखुरल्याच सुकून चालली आहेत. गुच्छ करितांच जी **काट** छाटली गेलीं तीं प्रत्येकी विसंगत नि अेकेरी दिसणारच. तरीहि रूक्ष ओसाड नि कांटेरी जंगलांत फुलणारीं, ज्यांना नांव ना गांव, अशीं रानफुलें असतात तरी कशीं म्हणून जर अेखाद्यानें तीं कौतुकानें अुचलून घेतलीं तर कौतुकासाठीं; नाहीतर वानरपत्यांच्या प्रयोग शाळेंत पाकळी पाकळी नि केसर केसर तोडला जाअून द्न्यान देवीला बळी पडण्यासाठी; निदान अंधारांत सुकायचीं तीं अुजेडांत तरी सुकावीं म्हणून;—ही त्या फुलांची पहिली परडी गांवचावडीच्या पायर्‍यांवर आणून ओतली आहे. ”

**विजनवासी.**

**[ सन १९२२ मध्यें प्रसिद्ध झालेल्या या कवितेच्या पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना. ]**

# कमला.



( अनुष्टुपछंद. )

फुलबाग किती शोभे लहान, नटवी, करी
नटुनी थटुनी नाना नखरे वरचेवरी: १
हिरवाचि कधीं शालू, सितमलमलिचा कधी,
रेशमी जरतारी वा जयाच्या पदरामधीं २
नित्य ताजे जितें मोती[१] पाच माणिक जन्मतीं:
पवनेंच तसें त्यांशीं नटवी डुलवी किती ! ३
हासतां कुंददंती ती जितमन्मथ मोहवी:
सुगंध सौम्य हास्याची ज्या चोरोनि नवी नवी ४
कला[२] अेकेक या लोकीं कामिनी सकला करीं
विश्वमोहक लावण्या निज: त्या मुकुटा धरीं ! ५
नौकेंत कौमुदीच्या ही नटली कितीदां तरी
बाग योजनगंधा[३] त्या वनदेव—पराशरीं ! ६

---

१ जितें मोती०:—अर्थात् निरनिराळ्या रंगांची फुलें.

२ कला०:—कुंददंतीच्या हास्याची अेकेक कला अर्थात् कुंदादिक फुलांनीं शोभित असलेल्या बागेच्या बहारांतील अेकेक फूल: तें सुंदरी आपल्या केसांत खोंवून आपल्या सौंदर्यावर मुकुट चढवितात.

३ योजनगंधा०:—श्लेषार्थानें पराशराशीं रमलेल्या कैवर्तक कन्येस अुल्लेखिलें आहे.

मांडवी ही प्रवेशाची जाअीनें विणिली जिला:
फुलें हीं हसरीं ये त्या आदरीति पलोपला ! ७
फुलें ? अहा फुले मा तीं अुद्यानीं विहरावया
रात्रींत चोरुनी येता अप्सरा, धरिले जयां ८
नोंद त्या दिव्य पाप्यांची ठेवूं जाअिवरी असे
चुंबनांचेंचि[1] त्यांच्या घे देवीद्वारप हे ठसे ! ९

वीथिका कदळीचीही: अुद्यानांतिल मर्मरी.
तया सुरेखिल्या पाथाच्चिया दों तटिं शोभली: १०
येत्या जात्यावरी मर्यादेनें आनतशा शिरीं
वारी विंजणवाऱ्याशी, आतपत्र अणी धरी. ११
निर्गंधते करी क्षम्या नम्रता कर जोडिती
अशीं केळफुलें, गोऱ्या गोड केळफण्या किती, १२
दलें सुलोल, हीं सारीं दाटतां मिसळोनि, ते
अव्यवस्थितशी शोभा बघुनी मनिं भासते: १३
कालिंदी पुलिनामाजी ज्यांहीं अुपभोगिला
यथेच्छ वनमालीशीं; पूर्ण, तृप्त, सुशीतला, १४
भक्तकामा, रतिश्रांता, आत्मा अेक जया हरी—
सखी म्हणुनि ज्या झाल्या, समतृप्त—परस्परीं १५
विगतेर्षा म्हणूनीया, जातां वल्लभ त्याच कां
तशा शून्यमना मार्गीं अुभ्या ह्या व्रजगोपिका: १६

---

१ चुंबनांचेंची०:—साध्या अपराध्यांचे आंगठ्यांचे ठसे घेतात. पण चोरींत सापडलेल्या अप्सरांच्या, त्या दिव्य अपराधी म्हणून, चुंबनांचेच ठसे घेतले. तेच फुलासारखे भासत होते.

कंठांत अेकमेकींच्या घालुनी करपल्लवा,
जातांही हरि तैशाचि कुड्मलांजलि[1] अन्य वा, १७
लोल कोमल पंल्यांसी कुणी पालविती[2] करीं,
गालागालांसि लावोनी मागली पुढती वरी १८
हेम गौरमुखा कोणी सनाल अपुल्या सखी
स्कंधीं सखीचिया ठेवी पाठेशीं लागटूनि कीं ! ! १९

शेवंती[3] हीः हरीं गेला चढाअी करुनी तदा
कुसुमाकर कीं कल्पी ढाल ही कुसुमायुधा ! २०

आणि हे सोनचाप्या, तूं शिकलासि तरीं कुठें
ही दिव्य किमिया ! आह्मा स्वयंमन्य नरां जिथें २१
रुप्याचेंही करायासी जड स्वर्ण न साधतें,
ओल्या मातींत सूर्याचीं किरणें पिळुनी तिथें २२
मृदुचेतन सोन्याचीं, स्वर्णचंपक, हीं फुलें
सुगंधी तुज पाहोनी निर्मितां मन हे भुले ! २३

प्रियाची सोनचाप्याची, चमेली किति ही खुले !
तो लिंब्यावरि ती त्याच्यावरती अुधळी फुलें ! २४

जातिनें शुचिर्वर्णी[4] जी; जी भूषा ललनाजना;
याचकांच्या सदा झुंडी झुलती मधु भोजना २५

---

१–२ हे आणि पुढील शब्द केळींच्या आणि गोपींच्या दुहेरी वर्णनास अेकत्र व्यक्तविणारे द्व्यर्थी आहेत.

३ शेवंतीचें फूल, शंकरावर चढाअी करून मदन गेला तेव्हां त्या कुसुमायुधाच्या हातांत ढाल होती ती हीच.

४–५ हे शब्द आणि पुढील सारे वर्णन केतकीच्या आणि कोण्या दानशूर प्रथित यश महिलेच्या वर्णनास अेकत्रच व्यक्तविणारे असे द्व्यर्थी आहे. जसे शुचिवर्णाः रंगानें निर्मळ किंवा अुच्च वर्णीय, शुद्ध कुलांतली.

दानशूर जिच्या दारीं; देवाच्या सुभगा पदा—
कीं शशी[1] स्वकला तैशी—शकला तनुच्या सदा  २६
अर्पी जी अर्पुनीः साधूं स्वार्थ? ना लवलेशनाः
परी केवळ कल्याणा लोकांच्याः मुनिसाधना  २७
करूं सांग तयां देउं मोक्ष मुक्तिः पडे गळा
गौरी गौरीहराच्या जी निष्कामा; अजि तूं बरा  २८
तया ह्या केतकीच्या, हे गंधवाह! दिशा दिशा
प्रसिद्ध गुणगंधाच्या करिसी धवला यशाः  २९
आणि मात्र यशासीची! खरी खोटि कशी परी
अुक्ति कुत्सित कीं हीच्या भुजंग[2] लपती घरीं:  ३०
अवाक्षरहि ना तीचे वदतां! तुज तेंच कीं,
पावना पवना, शोभे! स्वार्थं विन्मुखता निकी  ३१
ही ज्यांची, मंगळा लाखो लोकांच्या झिजती, जया—
विना वसुंधरा व्हावी अल्परत्ना, अशा तयां  ३२
जगद्धर्मी महात्म्यांच्या गृहस्खलित मानिती
स्पृहणीय न तत्रापि गोपनीयचि सन्मती!  ३३

पुन्हा हुडकितां माते फिरे काय असा अतां
क्रुद्ध हा त्या त्रिनेत्राचा तिजा नेत्रचि जाळिताः  ३४
पाहूनि भास्करा भारी खाओ धास्ति अनंग ही,
कीं दुखें पोळली जिव्हा पी ते फुंकुनि ताकहीः  ३५

---

१ चंद्रकला देव पाळीपाळीनें पितात ‘ पर्यायपीतस्य सुरैर्हिमांशोः कलाक्षयः श्लाघ्यतरोहि वृद्धेः ’—( कालिदास )

२ भुजंग=साप किंवा प्रछन्न प्रियकर.

ह्मणूनीच गमे नेमी मीनकेतन हा खुळा
गुप्त हेरचि सूर्यांच्यावरी[1], सूर्यफुला ! तुला ! ३६
तरीच तूं सदा डोळा ठेवितोसि रवीवरी[2]:
अभंग तरिची दंगा भारी रात्रितुनी करी !! ३७

नाना बालतरू देशा विदेशांतिल आणुनी,
फुलें किती अशी ज्यांची पानें रंगित देखणी: ३८
तशीच फुलझाडेंही विचित्र नटवीं किती:
कुंड्या कुंड्यांतुनी होतीं गुच्छांहीं रचिलीं पथीं. ३९

सभोंते फुलबागेच्या वर्तुलाकृति रेखिलें
तृणस्तबक जें गार हिरवें हिरवें खुलें: ४०
प्रभातीं तृणवेलीसी त्यांतल्या धवलीं अती,
अती चिमुकलीं, लाखों फुलेंहीं फुलतां किती ४१
मनोज्ञ तरि ती शोभा ! यामिनींत, गमे हृदीं,
होती वहात जी येथें ज्योत्स्नेची रसिता नदी ४२
प्रभातिच्या हिमें कांती घनीभवन घे नवें:
चकाकतीं फुलें ना हीं—चांदण्याचे रवे रवे !! ४३

वशीकरण चूर्णासी देत त्यास तिला हरूं,
मंत्र गुंजत त्या भोगक्षमा ज्या कालिका करूं, ४४
ह्या फुला करुनी लागूं त्या फुलांशि परोपरी,
हिचे चुंबन दे त्याशी त्याचे देत हिला, अली[3] ४५

---

१ सूर्यफुल सारखे सूर्याकडे बघत फिरते अशी लोकोक्ति आहे.
२ रात्रींत सूर्य पाहील ही भीति नसल्यामुळें.
३ अली: भृंग, मधुप.

दयिता दयितांमाजी सुमलोकांतल्या पहा !
घाली खेपा मधावारीं मदनाचा दलाल हा ! ४६

धोतऱ्याचीं महादेवा फुलांत रुचलीं फुलें:
गुणाधरत्वहि मोठ्यांचे मोठेची असणें बरें ! ४७

फळ ह्या निशिगंधाचें हें: अधीरवितें हृदें
कामसेना पुरोगामी रौप्यशृंगचि काय तें ! ४८
छोटेसें स्फटिकांचें हें अष्टपैलु मधें खुलें
लीलासर, सदा पूर्ण स्वादु शीतलशा जळें. ४९
कारंजें शतधारांचे कासारांत तया उडे:
नर्तन बिंदुवरी त्याच्या तेजोबिंब यदा पडे ५०
तदा गमे असा लीलासरा उडत ये तया.--
थवा अिंद्रधनुष्यांच्या पिलांचा विहरावया ! ५१

जळार्धमग्ननाळा ह्या शोभती नलिनी तशा
शोभती लाजल्या गोपी यमुनेंत तशीं जशा: ५२
हृच्चोर पोर नंदाचा वसनें हरि ज्या क्षणा
आणि त्या प्रिय पाप्याच्या दृष्टी तुष्ट करूं मना ५३
शक्यतों नग्न तन्वंगें करूनि वरतीं जळा,
'दे न रे हरि वस्त्रें तीं !' गोपी याचिति आकुला ! ५४
—नायकेचि परी खोटा: या तशाच ह्मणे, वरी !
छंदें त्या कीं मृगी तैशा होत कर्षित सुंदरी ५५
आल्या तीरीं: अहा, तीरावरी ! नवनवें तधीं
लावण्याचे पुटातूनी पुट दिव्य पदोपदी ५६

घेत घेत विकासा जैं रविसी नमिलें करें:
वायु निश्चेष्ट, सूर्याचे अंशु आनत, आदरें ५७
करीत तंविं जे देवप्रिय दर्शित जाहले
विश्वमोहन मद्याचें पेले चेतन पोवळें, ५८
जीवनाच्या अुषा ज्या, जीं हृदयें रतिचीं निर्की,
प्रेमकल्पसुमें तीं हीं--फुलले न गुलाब कीं !! ५९

*

* *

देवताची तथा आरामाची[1] काय मनोरमा
बाला अेक अशी येअी वेचूं नित्य तिथें सुमा. ६०
ढाळी बाग सुमां मार्गी मार्दवा बघुनी तिशी,
प्रतिपद्[2] चांदण्या येतां व्योमीं चंद्रकला जशी. ६१
चंद्रिकेच्या प्रभाताच्या मिश्रणांत अुषा जशी
कैशोर यौवनामाजी शोभे ती सुदती तशी. ६२
तुषारमय धारांच्या झाऱ्यांहीं सुजलांत ती
शुचिस्मिता स्वयें न्हाणी वेली पुष्पलताप्रती ६३
पुशी मलमलिनें त्यांचीं पानें; साहस नापरी
मअू मलमलिनेंही ती पुसाया कुसुमें करीः ६४
पाकळ्यांनीं गुलाबांच्या पुशी अन्य सुमें आणि
ओठांच्या पाकळ्यांहीं ती गुलाब नव चुंबुनी ६५
पयोघटीं तिनें द्यावें पयःपान स्वयें असा
ग्रीष्म वर्षाहुनी व्हावा त्या बागेसि वसंतसा. ६६

---

१ आराम—बाग, अुद्यान.
२ प्रतिपद्ः—प्रतिपदा तिथि.

लुप्तान्ह ऱ्हावणाऱ्या त्या झडींत उघडें जरा
होतांचि, भानुच्या कोव्ळ्या किरणासम तत्पला ६७
लतांत शिरुनी, तोयें करी आकुळ फार ते
फुलांचे कमलांचे ती पेळे ओतुनिया रिते. ६८
खातीं लताफुलें अैसे किडे मात्र सदा तिनीं
हळूच धरवूनीयां सेवकाकरवीं, अणी ६९
ज्यांत आंथरिली पानें फुलेंही गळलीं अशा
पेटाऱ्यांतुनि द्यावे कीं रानीं धाडुनि दूरशा. ७०
लीलावती जरी कैंती लतेच्या बसली तळीं
विणीत कशिदा चोळीवरी सुकुशला तरी ७१
अल्प काळेंचि ओशाळे व्हावे तन्मन: "सत्य ते!
किती आप्पलपोटी मी! नकोस रुसुं अं लते! ७२
आलवालीं तुझ्याही मी घे नवा कशिदा भरीं;"
असें कूजतची प्रेमें आलवालाचियां वरी ७३
रम्याकृतींत पेरूनी नांव दे अपुले अणी
नांव त्या लतिकेचेंही निज चोळिवरी विणी; ७४
राअी राअी परी, भारी देखण्या परि, आकृती
फुलांत फुलतां, काढी चोळी वापरण्या तधी. ७५
केव्हां केव्हां सुमाभोंती भ्रमरांची सुचाटुला
अैकतां सलगीची ती कुजबूज: ' अरे मला ७६
सांग गुंजत भुंग्यासी काय तूं असती तरी?
फुला बोल न माझ्याशीं, गज गोष्टी तशा करी!' ७७

लतेसी लावुनी गाला लाडानें वदतां असें
सुमाशी सुकुमारी ते श्रवणा श्रवुं नेतसे ! ७८
पदघातांहि[१] दे जीचा अशोकासि विशोकता,
गाल त्या ललनेचाची असा कोमल लागतां ७९
यावी व्रजासही वाचा ! मग हीं तों लताफुलें !--
असें मंजु वदावीं कीं भासे बुलबुल बोलले ! ! ८०

प्रातःकाळीं तिची सासू हौसेनें कथितां कधीं
'वेणीस, जा, फुलें बाले आण आवडलीं हृदीं:' ८१
बागेंत तैं तिनें जावें परी हात न लावितां
पहावें जरि होवोनी ढाळिती कुसुमें लता ! ८२
आणि सत्य कथीं, कैसा तिच्या मोहुनि मोकळ्या
फुलें काय–लतांनीं त्या ढाळाव्या फुलत्या कळ्या ! ! ८३

निजाभरण कार्यींची असे न मन तें परी
देवपूजेसही तीचे खुडाया न फुलें करी ! ८४
कीं फुलें खुडितां ये जो रस तो बघुनी हृदीं
वाटे, रक्त लतांचे ये ! सासू जों न असें कथीं: ८५
'देवकार्यीं, अहा बाले, लतांचीच सुमें किती !
यौवनाचीं सुमें वीरप्रसू तोडुनि अर्पिती ! ! ८६

बागेंत चांदण्या रात्रीं कैं सलील सुमोहना
रमे इतस्ततः जैशी प्रीति स्वप्निं सुचेतना ! ८७

---

१ पदघातः—कविसंकेत आहे कीं अशोक, बकुल, प्रभृति तरूंचे दोहद असतात. कामिनींच्या पदघातानें अशोकाचे आणि कामिनींनी चुळा टाकल्यानें बकुलाचे दोहद पुरतात !

तिनें [1]कमलिनी येतां वाजुं द्यावि न पाउलें;
सुखे निद्रित कीं, जावे पाहुनी अितुकें पुढें. ८८
खालुनी पारिजाता ती जातां त्यासि निजेमधीं
स्वर्गिंची सहसा स्वप्नें लागावींत पडूं तधीं !: ८९
आणिला भांड [2]भामेनें खालीं, पासुनि--त्या दिना
स्वर्ग आज दिसे ! ढाळी तो सुखाश्रु सुमासिना ! ९०

लहानपणिंची झाले तिचे लग्न; तयादिना—
पासूनि या सुमा सोडूं व्हावें दुःख असें मना ९१
कीं, घे माहेरिंही जातां पाय मागुति मागुती:
मायशीं जों तिची सासू असें न समजाविती: ९२
'अगा, अगी, मुली ! येशी तों तुझीं लतिका फुलें,
तुझ्याच मानुनी ठायीं प्रतिपाळिन मी बरें !' ९३

येतां त्या मंगळागौरी कोण अुत्सव तो मना !
सुशुभ्र वसना, शुद्धा, अुद्यानीं निज शोभना ९४
जातां वेंचित पुष्पांसी ये, सुश्वेत जिथें तळा
मोगरींच्या फुलांचा कीं दाट दूरवरी सडा: ९५
तदा दिसे समावोनी त्या फुलांत मनोरमा
हिमालयीं व्रतीं जैशी असावी दिसली अुमा !! ९६
वनोपवनिच्या नाना पाकळ्या, कलिका, किती
मंजिऱ्या त्या, दलें तीं, तीं फुलें, रानफुलेंहि तीं ९७

---

१ कमलिनी रात्रीं फुलत नसून मिटून जातात, निजतात, हा कविसंकेत.

२ सत्य भामेच्यासाठीं पारिजात श्रीहरीनें स्वर्गांतून खालीं आणला अशी कथा आहे.

रंग रंग निराळेचीं! परड्यांपरड्यांतलें!
गुलाब, कमळे, चांपे, बकुळें, बटमोगरे!! ९८
पूजेसी जै बसे भोंती ही रचूनि दळेफुलें
कल्पनांच्या मधें जैशी कविताच तशी खुले!! ९९

पऱ्या वाहवुनी कांहीं, पूजा सांगुनिया, घरीं
भट जाति; तदा भावें स्वयेंची मग सुंदरी १००
मंगळा मंगळागौरी गौरी तोषविण्या मनीं
वाही दळें फुलें तीं तीं नांवें घेअुनि घेअुनी-- १०१
सुरंगांच्या सुगंधांच्या त्या सुरेख कुप्यांतला
ललनाहृदिं कीं ओतो रस तो ललिता कळा: १०२
सांग होअी असा तैं त्या सुंदर व्रतिचा तअीं
पारमार्थिक तो तैसा हा प्रासंगिक हेतु ही! १०३

*

* *

ज्याचे भाव सुमांच्याची सुगंधावरती असे
वाटले, बिसतंतूंच्या राजहंस वरी जसे: १०४
ऋजुत्व, शुचिता, दैवी सात्विकत्वहि कां हवें
त्या मनाचे पुसाया! त्या भ्रूकौटिल्य[1]हि कां शिवे!! १०५
शांत तद्दृष्टिसी सारी सृष्टि शांतिमया गमे.
रूपीं यौवन तोंही ती बाळताच हृदीं रमे. १०६
रूपीं कुळीं, वयें, होता रुचला पति जो तितें
वेशींत यौवनाच्या कीं विशींत शिरला कुठें. १०७

---

१ अितर कौटिल्य (कपट) तर राहोच पण यौवन सहज असे निष्पाप भ्रूकौटिल्य, नयन चांचल्य, देखील तिला शिवले नव्हते!

सासूनें धाडिता वाढूं, गवाक्षीं क्षणि ये तधी,
सन्मुखी चुकुनी येतां पथें अेकाचिवा कधीं, १०८
सुंदरीं सुंदरीची त्या दृष्टादृष्ट घडे जरी
कन्यके कमलेच्या त्या तरी सात्विक अंतरीं: १०९
देवमूर्ति तशी जी कीं पूजनार्थचि निर्मिली,
चंद्रलेखा तशी जावी जी दुरूनचि ध्यायिली, ११०
मनींच जपली जावी गायित्रीच,--अशाहुनी
काय भाव दुजा यावा पतिमूर्तिस पाहुनी ! १११

*
* *

वाढवा जो नवीनाचा, आज तो सण पाडवा !
शुभे, हो शिव हें तूंतें नवे वर्ष, अृतू नवा !! ११२
आशा[1] आशा तशा आजी अुष्णशीतल मानवा:
शुभे, हो शिव हे तूंतें नवे वर्ष, अृतू नवा !! ११३
पिक गाति वसंताचा अैक मंजुळ गोडवा:
शुभे, हो शिव हें तूंतें नवें वर्ष, अृतू नवा !! ११४
नवी तिथि, नवा मास, नवे वर्ष, अृतू नवा:
आजि कां मिरवावीना रूपश्रीहि नवी तुवा ! ११५
होति लावण्यलक्ष्मीची नित्य पाहत ती छबी
सासूसही प्रभातीं त्या तरी ती दिसली नवी ! ११६
शंकाही ये मनीं आशा आणी अुत्सुक अंतरीं !
मायशी ती तरी सासू अितुकेंचि वदे वरी: ११७

१ आशा=दिशा; सर्व दिशा ह्या मानवाना त्या दिवशीं आशेसारख्या सुखदशीतोष्ण भासूं लागल्या.

' केसांहीं मोकळ्या बाळे, जाशि बाहिर ना ! मला,
पाडवा आज, काढू दे बैस दृष्ट तुझी जरा !' ११८

वेणी घालावया सासू हौसेनें मग जै बसे.
कांहीं चिंतितची तों ही मधें खुदकनी हंसेः ११९
' हससी कमले कां तें' " नाहीं: अेक पडे मशी
स्वप्न काल मजेचेचीः माझी ती नलिनी जशी, १२०
सराच्या अुजव्या बाजू नाहीं काय?, जिच्या कळ्या
पहिल्याच बहाराच्या झाल्याहोति फुलावया ? १२१
--ती आणि मी जशा गेलों शोधूं ताप्रियसा अली[1]
अुषःकालाचिया अेका बसूनि झुळकेवरीः १२२
गेलों गात ' तुझीची ज्या वाट पाहत राहिल्या
ये, शिलीमुख[2] ! ये, स्पर्शें फुलीव चल या कळ्या!' १२३
आला लुब्ध अलीही तों !—सोडुनी नलिनी परी
मेला माझ्याचि ओठाला दंश येअुनि हो करी !!! १२४
स्वप्न हे नलिनीला तों असें मंगल ना परी ? "
सासूचे ती सुखाश्रूही पाहती, वळती तरी ! १२५
स्वप्नार्थ[3] हृष्ट होताची, हृष्ट त्याहुनिही परी
अजाणपणचीं बालेचे हें मोहक त्या करी. १२६

---

१ अलीः—भ्रमर.

२ शिलीमुखः—भ्रमन. हे विशेषण अिथें साभिप्राय आहे.

३ स्वप्नार्थः—त्या यौवनोन्मुख बालिकेच्या शारिरीक स्थित्यंतराचे प्रतिबिंब मानासिक व्यापारांतही न कळत कसें पडत चालले होतें तेंच नलिनीच्या ' पहिल्या बहाराच्या कळ्यांविषयीं ' हें तिचे स्वप्न सूचित करीत होते. ही कौतुकास्पद गोष्ट तिच्या प्रेमळ सासूच्या लक्षांत आल्यावाचून राहिली नाहीं.

वेणी होतांच सासू दे जी पाठीस तया दिशीं
थाप, ती आजिच्या लागे चुंबनाहुनि गोडशी ! १२७
केशोरातूनि ज्यानें ना यौवनांतचि घेतली
विद्यार्थित्वांतुनी विद्वत्तेतही पदवी परी, १२८
कुशाग्र बुद्धि तो तीचा कमनीय पती घरा
आजीच्या आग्रहें आला कराया सण साजरा. १२९
पुष्पमाळा गुढीसाठीं होती गुंफित ती जिथें
अुद्यानांत, युवा पाही गवाक्षांतुनि तो तिथें ! १३०
पाहीः अले! जपूनी कीं ! ही मनोभव पंजरी
फसवा न वसंताची तुळा मोहक मंजिरी ! १३१
आणि धीर सुटे साराः आजि निश्चियलें मनें
तिच्याशीं पहिलेची तें लज्जाव्याकुल बोलणें. १३२
आजिशी चुकवोनीया, धीर अेकवटूनिया;
गनीमी धरसोडीनें येत जात टपूनिया,— १३३
आला ! आला तिच्या पार्श्वीं ! येताची परी सन्मुखी
—नीट आला तसा गेला शब्दही निघता न कीं ! १३४
जाणेंची ते परी घाली मूक प्रश्न तिला, आणी
पृच्छे त्या अश्रुता 'हो ! को !' अुत्तरें अुठली मनीं ! १३५
अुठे वरी, बघे खाली, रंगे गाल, सुअी गळे;
सुमासम गमे कांहीं हृदांत तिज बोचलें ! १३६

---

१ अर्थात तिला नकळत फुलधनू मदनानें तिच्यावर सोडलेला पहिला फुलबाण हृदयाला ओझरतां लागला! पण तिला मनांत फुलासारखें कांहीं बोचलें अितकेंच वाटलें. कारण तिचीं सगळीं सुखदुःखें अुपमान--अुपमेयें, फुलांच्या जगतावाहेर अजून पडलींच नव्हती.

सासुपासूनि चोरावी गोष्ट ती पहिली अशी:
अशांत पहिल्यानेंची तिचे लोचन त्या दिशीं, १३७
मिष्टान्नें जेववी सासू, मिष्ट त्याहुनेंही परी
चुटपूट मघाची ती लागली अभ्यंतरीं ! १३८
तिसऱ्या प्रहरींही ती, करमे न म्हणूनियां,
जाअी जाअीजुअी वेलीलतांत विहरावया, १३९
तीरच्छाये सराच्या तों लाडक्या बकुळें तिला
लव वांकवुनी शाखा प्रेमें आडविलें जरा। १४०
“ काय तें ? ’ ती पुसे स्नेहें कुरवाळित त्या कमला
बालिका, ‘ बकुला सांगे: लाजावें न तुवां मला ! ” १४१
वाचिलें जें कधीं त्यांची स्मृति होअुनि अंतरीं:
“ कोण जाणे ! परी बाअी, वदती कवि तें जरी १४२
अहा सत्य ! ’ मनीं भावी ती द्रवूनि ‘ न मी तरी
माझिया बकुळाचे तें कोण कोड पुरें करी ! ” १४३
सौहार्दें, कौतुकें आणी, तन्वी त्याचि सरांतली
चूळ घे भरुनी आणी टाकी त्या बकुळावरी ! १४४
लज्जा करी कसेंसेंची पाही कोणि न ये: तरी
भरी चूळ, पुन्हां पाही, पुन्हां टाकि, पुन्हा भरी ! १४५

तोंचि ससरले कांहीं ! कुंजातूनि, पहा पहा !
कोण तो, कमले, येअी ! चोर ओळखिचाच हा ! १४६

---

१ बकुल वृक्ष कामिनींनीं त्यावर चूळ टाकली असतां फुलतात असा कविसंकेत कुठेसा वाचलेला होता तो तिला, बकुलानें आडविली त्यासरशीं, सहज आठवला.

आलाः संभाळ, आलाची ! थांबरे क्षणची तरीः
असावधावरी घाला रीत ही न तुझी बरी ! १४७
धरिलाचि परी पक्षी ! वार्धक्यें आजि आंधळी
वदतीच नभोवाणी 'धर्मयुद्ध न हें' तरी ! १४८
चोरट्या कटिला गुंफी कापता कर तो झणीं:
लाजऱ्या लागती गाला ओठ लाजत त्यांहुनी ! १४९
साचीकृताननाा, लज्जाचित्र हृद्य, अशा तशीं
प्रियेच्या पहिल्याची तो चुंबनासि युवा पिशी ! १५०

प्रियेच्या पहिल्याची हें लज्जाचंचल चुंबना ।
कोण प्राणी जगीं कीं जो विसरेल तुझ्या क्षणा ! १५१
असूनि पल[1] जो पाजी चुंबना तुझिया रसा
शताब्दांहुनिही होशी तरी अपल[2] तो कसा ! १५२
तुझ्यांत दिव्य जी चोरी, गार जो चटकाहि कीं,
त्वरा थांबविती, सक्ती शिष्ट, संमति जी मुकीः १५३
चुंबना पहिल्या! दे ती सुखमादकता जशी
प्रियाननार्पिता मद्यांमाजिही न पुन्हां तशी । १५४
अगीच रुसुनी माहेरींचेची जन ज्या घरीं
आणूनि संधि ही देती बोलूंही न अह्मां पुरीः १५५
पत्रीं शरणचिठ्ठीही टाकिता शितरा जना
चोरूनि, तीवरी जाती पाय देउनिः चुंबना ! १५६

---

१ पल—क्षण; किंवा जो पळतो, चटकन निघून जातो तो.

२ अपल—न पळणारा.

मानिनीसहि त्या स्वप्नीं दिसे मूर्ति तुझी अणी—
मूल्य[1] चंदनपद्मांचे बाजारांत चढे क्षणीं !! १५७
स्नेहशून्य स[2]हारे जे आयुष्यांतिल घोर रे
विवासनीं अशा जेव्हां जीव व्याकुल हा झुरे: १५८
किंवा विणी कसें जाळें कोळी हीच मजा जिथें
काळ–खोलींत बंदीच्या तैं तिथेंहि, सख्या, तिथें १५९
प्रियेच्या पहिल्याची हे मुग्ध प्रेमल चुंबना !
तुझिच स्मृति जावोनी भेटवी विरही मनां !! १६०
वाजे कांहीं ! अ[3]ली झाला चुंबुनी पळता ! अणी
कळी स्पर्शसुखोत्कट्यें त्या भेदोन्मुख तत्क्षणीं !! १६१
पुसे हळूचि सासूसी 'पोटीं कां अुठती कळा !'
पोटीं कां हृदयीं ! मुग्धे, अद्यापी न कळे तुला ! १६२
कळा ना शशिलेखे, ह्या ज्योत्स्ने[4]च्या फुलत्या कला !
म[5]धु–प्रतिपदा होवो मधु प्रतिपदा तुला !! १६३

*
* *

---

१ प्रियसंगमाच्या स्वप्नामुळे विरहाने मन पुढां व्याकुळ होअूं लागतें. तो विरहताप शांत करण्यासाठीं चंदनाची अुटी आणि कमलांची शेज यांचा आश्रय करावा लागतो. त्यामुळें त्या द्रव्यांचा खप वाढल्यानें, मूल्यही चढूं लागतें !

२ सहारे:—निर्जल वाळवंटाचीं ओसाड मैदानें अर्थात् आफ्रिकेच्या सहाऱ्याप्रमाणें मानसिक सहारे.

३ अली:—भ्रमराचे तिला पडलेलें स्पप्न ज्यानें असें खरें केले तो युवक.

४ अर्थात् यौवन ज्योत्स्नेच्या.

५ मधु ( वसंत ) प्रतिपदा ( पाडवा ) ती तुला प्रति पदा ( पावलीं ) मधु ( गोड, मनमोहक ) होवो !

प्रात:काळीं अुषा तैशी रंगे[1] सून सुमंगळीं।
तिच्या वत्सल सासूच्या कोण अुत्सव अंतरीं। १६४
वेली कल्प प्रसूनांची सून साजत: होतसे
कोठें ठेवूं अणी कोठें न ठेवूं तिजला असे। १६५
देहधर्म नवाची तो, तें बाजू बसणें दुरी,
शिवतां न जनांचें तें जाणें पाहुनि सत्वरीं: १६६
ओझाळे युगपत्स्थित्यंतरें तन्मन, होतसे
अनोळखी जनीं जावें चुकलें चुकले तसें. १६७
सासूचा तो परी आश्वासवी हर्ष झणीं तिशीं:
कीं जें हर्षद सासूशी शुभ तें असणारची। १६८
प्रेमाशीर्वचनांचा तो वर्ष न्हाणवली वरी:
तिच्याचि न परी होअी हर्ष थोर घरोघरीं. १६९
सुरम्य मखरामाजी रमणी मग जैं बसे:
श्लोकांत कालिदासाच्या अुपमाच तशी दिसे। १७०

पौर बालांगनांचे तों रम्य मंडळ दाटलें:
ज्यासि त्यासि तिची सेवा करूंचि लव, वाटलें: १७१
काढी रंगावली कोणी, गुंफी हार कुणी, कुणी
मांडी फरेमरें, कोणी हसवी तिज हांसुनी: १७२
वाढणीं गृहिणी नेती, वाद्यें मंगळ वाजतीं,
वांटिती अत्तरें, देती कुंकुमा कुसुमा किती: १७३
सधूप रुचिरें पात्रें नैवेद्यासम मांडुनी
'घेच घांस तरी' ज्या त्या प्रार्थिती कर जोडुनी: १७४

---

१ रंगे सुमंगळीं=अृतु प्राप्तीच्या शारीरिक आणि धार्मिक सुमंगल संस्कारांनीं.

मांगल्य देवताची तैं शोभे त्या ललनांत तीं,
मंदिराचें तया येअी स्वरूप मखराप्रती ! १७५

परंतु तो युवा येतां व्हावें जातिलसें कधीं !
जातांच तो परी व्हावें कधीं येतिलसे हृदीं !! १७६
आणि काय करावें हो त्यांनेंही ! वरचेवरी
वस्त्र, पुस्तक, कांहीं ना राहे काहिं तया स्थलीं ! १७७

थाट त्या मखराचा, तें दाट मंडल भोंवतें
सलील ललनांचे, ते भाव नूतन मोहिते, १७८
परंतु शकलीं हीं ना सर्व विस्मरवूं तया
तिच्या आवडत्या वेलीफुलांच्या विरहासि याः १७९
तत्तोषा तत्सखी ना तैं सिंचिता भरतां जलें
तिची न तितुकी सेवा लतांची करणें पडे ! १८०
येतां सुंदर रंगांचीं मखरीं फुलपांखरें
गमे बागाचि त्या धाडी बोलावूं मजला त्वरें ! १८१
स्वच्छंद त्या रमूं देअी पात्रीं भावित सुंदराः
“ जेवी यथेष्ट, हे माझ्या फुलाच्या फुलपाखरा ! १८२
आणि जा सांग जावोनी कीं सुदुःखित अंतरीं
तुह्मांहूनि, लतांनों, हा वियोग कमले करी ! १८३
सुकतील लता स्पर्शें सासूचें वच हें दुरी
दिन दोन तुह्मासाठीं तुमच्या कमले करी ! ” १८४

आणि न्हातांचि ती बाला चवथ्या दिवशीं सुटे
जशी झुळुक अुद्यानीं कुठेंच्या हरवे कुठें ! १८५

बाल्यीं बागेंत तैशी कीं रमे हांसत खेळतां:
परी बकुल तो येतां--अहारे मदना हता ! १८६
गालांवरी गुलाबांचीं जुईंचीं सहसा फुलें
मनांतूनि कुणी मारी ! तसें मंजुल लागलें[1] !! १८७
आधींच लाडका आणि यच्छायेंताचि तें दिलें--
नव्हे हो, चोरट्यानें त्या बलें चुंबन घेतलें !-- १८८
दुहेरी प्रिय तो असा बकुल प्रमदे तशी
चूळ, चुंबन, ती भेदोन्मुखता, स्मरवी हृदीं ! १८९
आणि पुष्पवतीचें[2] त्या मनशंकित जाहले
टाकितां चूळ येताती बाले कां बकुलां फुलें !! १९०
--आणि लज्जितही किंचित्: कीं अतूंत सुवासिनी
जशा पुष्पलता तैशा न कां पुष्पवती जनीं ! १९१
मुहूर्तीं मग जैं धर्म्यीं शांति मंगळ[3] योजिली,
आणि माहेरिचीं आली सर्वहि[4] प्रिय मंडळी: १९२
त्या दिशीं पूर्णसौख्या ती ! अेके ठायिंच कीं शके
माहेरीं सासरीं आणी अुद्यानीं निर्वंसूं सुखें ! १९३

---

१ फुलघनू मदनाच्या फुलबाणांचा नेम या वेळेस पुष्कळच अचुक ठरला ! गालावर गुलाबांच्या नि जुअीच्या रंगांच्या लहरी अुसळल्या: ते सुखद फुलबाण ह्यावेळीं असे नेमके ‘ लागले. ’ पण गोड ‘ लागले ’ ( वाटले )

२ कन्यकांच्या चुळीनें बकुल फुलतात असें समजून तिनें मागे बकुलावर चूळी टाकल्या. पण त्यासरशी तीच ‘ पुष्पवती ’ ( ऋतुमती ) झाली ! तेव्हां तिला आपण तो कविसंकेत वाचतांना चुकून अुलटा अर्थ समजलो कीं काय म्हणून शंका आली !

३ ऋतुशांतीचा धर्मसंस्कार.

४ मागचे ९१ ते ९३ श्लोक पहावे.

अरुणासम दंपत्या तरुणा शुभ त्या दिनीं
दुकूलवसना सालंकृता सत्वर आणुनी १९४
एकासनींच होमा जैं बैसवीति तया क्षणीं
जोडपें तें खुलें जैसे चंद्र आणिक रोहिणी ! १९५
दक्षिणार्चीं हुताशीं जैं हवी देववुं कीं तिला
पुरोहित वदे, लावा करा स्वपतिच्या करा; १९६
करा तैं अंगुली कांहीं कर अंगुलिनां शिवे,
ओष्टांचे ना तसें लागे मिष्ट चुंबन हें नवें ! १९७
लज्जेने हलका आधीं, प्रेमधीट पुढें परी,
मधें मधें करीं देतां दाब किंचित अंगुलीः १९८
वादना चतुरा कीं ती स्वनदंडचि तो शिवे
हृत्पेटिका[1]द्वयीं गीति एकतान मधु स्रवे. १९९

शुक्राच्या चांदणीमाजी जसा चंद्र तसे तधीं
अंतर्धानासि अग्नी घे दीप्ति ठेवुनि ती—मधीं. २००
चौकीं रंगावलीमाजी तों चौरंगहि चंदनी
चौफुले ज्या रुपेरी तो रुंद सुंदर मांडुनी, २०१
न्हावूं घालावया नारी नेति तैं उभयां तयांः
गच्छ्यांतुनी वरी दाटे जन मौज पहावया. २०२
नाना तैलें सुगंधी त्या लावण्या अपुल्या करीं
लागली ललनांची तैं चढाओढ किती तरी, २०३
सुखस्पर्श पयांचा तों धो धो वर्षचि जाहला,
गच्छ्यांतुनी वरी दोघां सुमांचा पडला सडा. २०४

---

१ हृदयाची संगीताची पेटी.

कुणी त्याकरवीं तोया फेकवी लव तीवरी,
टाक चूळ कुणी तीते हळु आग्रह वा करी, २०५
फेकीं फुलें, करी कोणी रंग घालुनि केशरीं
लपूनि पिचकाऱ्यांचा मारा मंगल त्यांवरी. २०६
खालीं सज्जांतुनी येतां, जातां खालुनियां वरी,
युव्यांची युवतींची तैं कोण धांदल हांसरी ! २०७
हास्यीं वामा स्वनांमाजी त्या युवस्वन जाहले
स्वरांत सनयांच्या कीं जसे मंजुळ चौघडे ! २०८
त्या अृचा, मंत्रची ते कीं, नवीन अभिषेचिती
प्रेम सिंहासनीं सम्राट् काम तो आणि ती रती ! २०९
युव्यांची युवतींचीची अशी धांदल ना परी
वृद्धही बालसे होती हांसते वरचेवरी. २१०
न्हातां अेकासनीं अेसे किती चोरियलीं तरी
अंगें स्वयेंचि अंगासी लागताति परस्परीं: २११
मअू मअू असें कांहीं मअू तें सुख लागलें
धरीच वर्षिष तो तीतें--झोंक जाअूनिया बरें ! २१२
पडद्यांत गुलालाच्या, जळांच्या गळत्यामधीं,
घेववे न तिला दे ती संधि साधुनि तो तधीं. २१३
अशी परिचिता होतां प्रियमूर्ति अनुक्रमें:
दुरोनी नचि,--ओंठांहीं प्यावी चंद्रकला गमे ! २१४

---

१ मागील ११० ते १११ ह्या अनुष्टुपांचा संदर्भ अिथें अभिप्रेत आहे. ह्या संस्कारांतीलही अेक हेतु हा प्रिय परिचयाचा ‘ अनुक्रम ’ च असतो.

आले आहेर तीं झालीं पुण्य ब्राम्हणभोजनें,
रचिलो सुमशय्याही नव ती युवती जनें. २१५
फसवूनि तिला नेती तिथें जै, सहसा तदा
हांसल्या युवती तीच्या धडकी भरतां हृदा ! २१६
वधूविभूषणा लज्जा ने तिला पळवूनि ते
माय आणी तिची सासू मायेशी[1] बसल्या जिथें: २१७
तों तिथेंच युवाही तो सहसाचि दिसे तिशीं !
येतां अेकेक ना येतीं संकटें जगतीं अशीं ! २१८
हांसूनि कौतुकें, प्रेमें पोटाशीं धरुनी तिला
सासू वदे: वदे आअी कुरवाळुनि त्याजला: २१९
लाजूं नकाचि, बैसा या, अेकत्रस्थितसे तुम्हां
डोळे भरूनि पाहूं द्या प्राणाचि अमुचे अम्हां ! २२०
पाहूनि जोडपें दोघी अशा सद्गद कीं हृदीं
कोण आअी अणी सासू दोघांही न कळे तधीं. २२१
' पितृदेव मुकुंदाचे[2] असते जरि या दिनीं
कोण हर्ष अशी होतां सून सुंदर पाहुनी ! ' २२२
' आणि बाअी अजी माझी असती विमलो[3] जरी
मेहुण्याच्या किती ती या कौतुका करिती तरी ! ' २२३

१ आअीसारखीच मायाळू.

२ मुकुंद:–हें त्या युवकाचें, कमलेच्या पतीचें नांव. त्याचे वडील लहानपणींच निवर्तले. ती व्याकुल आठवण त्याच्या आअीस झाली.

३ कमलेचीही विमल नांवाची बहीण तरुणपणींच निवर्तली. तिची आठवण कमलेच्या आअीलाही व्याकुल करती झाली.

अुत्सवांत असें त्याच्या नसें तें स्मरुनीं हृदीं
आनंदाश्रूंतही त्यांच्या दुःखाश्रू गळले तधीं ! २२४
  तिथें मुकुल तों येअी : कुमार नवयौवनी
वयस्य जो मुकुंदाच्या प्राणसा रुचला मनीं. २२५
पाठीमागूनियां देतां कळूं न कमलेचिया
लोचनांसी धरीं हस्तें झांकूनी ललितां तयां २२६
‘ नांव घ्या, वहिनी ! नेत्रा मग सोडिन ! ना अधीं !
कलींत न अुधाराची प्रथा सत्य युगामधीं ! २२७
बरें, मुकुंद घेतां तें मग घेशिल तूंहि ना ? ’
तिचें मौन वदे कीं तो संधि[1] संमत तन्मना. २२८
नांवें लाजत घेतांची मुकुंद कमला अणी
त्यांच्या मातांहुनी होअी हाचि हर्षित तैं मनीं. २२९
बाहू बाहूंत गुंफोनी तेजःप्रेमगुणीं वयीं
समान सुहृदांची ती जोडी जाअुं अुठे जयीं २३०
खोडसाळ पुन्हां तैं तो वळुनी डंवचूं तिला
वदे मुकल कीं कैसा डाव साधुनि घेतला ! २३१
‘ लग्न कीं तुमचें होतां मीही घेअिन पाहुनि ’
स्नेहघोर प्रतिज्ञा ही कूजे तोहि तया क्षणीं. २३२
  राजीवलोचनांची ती नवयौवन कोमला
जोडी जिवलगांची ये विश्रमूं मग त्या सरा. २३३
औदासीन्यें तअीं कांहीं मुकुंद मुकलाप्रती
वदे “ होअि कससेंची मन्मनीं: हुरहूर ती २३४

---

१ संधि–तह.

कशाची न कळे लागे ! उत्सवास्पदिंही मनीं
रमे न दिनिं ह्या आतां !" "खरेंचि ! रविहा किती !' २३५
—हसे मुकुल, 'छद्मी वा मूर्ख ! कीं असल्या दिना
रेंगाळतोः जसा गेहीं अनाहूतहि पाहुणा !" २३६
मर्मीं परी मुकुंदाच्या विनोद शरसा शिरे
वदे "असाचि हा कां मी कामी ? तेंचि अहा खरें ! २३७
हें पहा मुकुला, माते तुजहूनि जगामधें
स्थान संपूर्ण विश्वासा वद कां वसतें कुठें ! २३८
पिता निवर्ततां माझा अल्प मी असतां वयें
मोठें मला लहानाची जाहली करिती स्वयें, २३९
असे आवडती ऐशी आओी हीः परि कीं पहा
मर्यादेनें न येती ज्यां सांगतां तिजही, अहा २४०
कामिनीसीहि किंवा ज्याः अशा कोमळ भावना
सांगण्या सुहृदाहूनी स्थान अन्य न यौवना. २४१
पुण्य वा पाप वा सांगे मनीं जें तुज तें ह्मणीः
तुझ्यापासुनि चोरावें, पाप अन्य न याहुनी. २४२
आबाल्य मुकुला, तूं मी अेकजीव परस्परीं
अभिन्नहृदय स्नेहें, भिन्न देह असूं तरी. २४३
तुवा मला न, कीं तूतें सोडिलें क्षणही न मीं;
छाया जशी तसे होतों आह्मी संतत संगमीं. २४४
सुभाषितें प्रमेयें वा शास्त्रांचीं स्मरतीं कीतीं
विशिष्ट प्रियशीं कीं तीं वाचिलीं तव संगतीं. २४५

संगतीं झुंजलो म्लेच्छांसह राष्ट्ररणीं सदा
भोगिल्या संगती साऱ्या संपदा आणि आपदा. २४६
निजलों अुठलों संगे, वेष संगत सारखे
ओळखूं न जना आलों कोण कोण असे निकें. २४७
माझ्याविना कधीं ज्यानें सुख ना अुपभोगिलें
आजि त्या तुज सोडूनी भोगूं कां सुख अेकले !— २४८
संगाचे कामिनीच्या मी ? सुहृद्द्रोह असा तिच्या
रूप लंपटतेचे दे मंगला अृतुशांतिच्या ! २४९
म्हणुनी असती तूं जो अविवाहितची करी—
लाडक्या कमलेसीही स्पर्श मी नचि तों तरी ! २५०
किंवा त्वद्वाक् पृथा[१] होवो ! कथो जें कथिलें तिनें !
पुण्यीं अलौकिकीं प्रेमीं तुच्छ लौकिक बंधनें ! २५१
आमुची त्यांवरी तैशी प्रीतिसंमति अंतरीं
प्रेमले—कमलेच्याही निर्विशेष अह्मांवरी २५२
वृत्ति[२] कोमल जी पांचा पार्थां व्याकुलवी तधी
हृदा व्याकुलवी ह्याही !" "अहारे सखया कधीं,' २५३
वदे मुकल मध्येंचि साश्रु गद्गद 'पावना
प्रेमाच्या या तुझ्या फेडूं शके न तरि कां अृणा !: २५४
बंधु ना न। स्वसा ज्याते ना माता पितरेंहि तीं
मृत बालवयींची ती आजि आठवती निकीं २५५

१ पृथा—कुंती.

२ ज्या सुखापासून आपले आत्मीय जन वंचित आहेत तें सुख आपण अेकट्यानेंच कसें अुपभोगावें हा जो प्रेमळ संकोच पांच पांडवांना द्रुपदकन्या कोणी वरावी या प्रश्नीं व्याकुळविता झाला तो.

त्या मला सर्वही तीं तीं प्रेमें दिव्य पुन्हा परी
लाभलीं ज्या तुझ्या लोभीं, मुकुंदा, तुज त्या जरी २५६
सौख्य, सौख्य तरी माते! तुझें मंगळ तेंच कीं
मंगलप्रद मातेंही! सखया बघ आणखी २५७
अविवाहित मीही जों तूं व्रतस्थाचि तोंवरी
होशी मदर्थः माझी ती लाडकी कमला परी? २५८
फुलांहूनि चमेलीच्या हृद्य हास्य जिचें सदाः
संन्यस्त तूं असा होतां रतिच्या पहिल्या पदा २५९
आगींत फूल तें जाओं, हाय! होरपळूनि कीं!
फुलासि फुलल्याहूनी पाहतां जळतां सुखीं २६०
मातावें जें असेंची कां असे निर्घृण राक्षसी
मुकुंदा मन हें माझें? हाय रे, अणखी तिशीं— २६१
अलौकिक असे अस्मत्सख्य पाहुनि होय जी
समान लेखुनी आह्मां आओची मजला दुजी— २६२
मुकुंदा जननीशीं त्या तुझ्या, ही तुमची अशी
वेल निष्फळ वंशाची बघवेल तरी कशी! २६३

"तुला क्वचितची ठावें मातांची हृदये किती
ऋतुस्नात स्नुषेमाजी घेता पुत्र सुसंगती २६४
आल्हादा पावती कोण्या अपृथक्करणीयशाः
वशीकृतजगत् कां ती वंशसातत्यलालसाः २६५
भावी ऐहिक सौख्याच्या आशा वा शुभभूतिचीः
श्रेयाची वा परत्रा ती नवी निश्चितता दुजीः २६६

यौवनाच्या अशांतीच्या शांतिची स्मृति कीं तशी
आपुलाल्या सुमिष्टा वा कळतां न विमोहवी: २६७
किंवा केवळ पाहूनी तनयासि सुमंगलीं
अहेतु हर्ष जो रोमांचितवी तनु तत्पलीं: २६८
वृत्ति सर्वांचि किंवा या: परि कीं जननी जनां
उत्कंठा सुतभुक्ता तो सून सुंदर पाहण्या ! २६९
त्यांतही कीं पिता ज्याचा बाल्यत्वींच निवर्तला
कुला अेकुलताची जो आधाराप्रिय राहिला २७०
रजाचा गज जो केला असा नंदन लाडका
पुण्यशय्ये स्नुषेसंगी सेवितां प्रथमा सुखा: २७१
अत्युल्हासीं तया तैं रे गमते जननी हृदा
आजन्मभुक्त कष्टांची, लोभांची, कृतकृत्यता ! २७२
" त्यांतही आपुल्याची वा आअीच्या तुझिया पहा
सुखाचा कमलेच्याही, प्रश्न केवळ काय हा ? २७३
न सख्या अनिरुद्धाचा अेक केवळ, कीं परी
अशेष जनसौख्याचा पाळणा रतिच्या घरीं ! २७४
अशेष जनसौख्या दे धर्म तोचि वदे श्रुती:
धर्मदा, शर्मदा, देवी रति—ना सुखदाचि ती ! ! २७५
राष्ट्र—सेवेप्रती झालों व्रतबद्ध तया अम्हा
रामदासीय दासांही तरी धर्म सुपूज्य हा: २७६
ओजस्विवीर्य—गांधर्व—विधिने अथवा अशा
पूता वेदी विवाहाची वाढवी निजराष्ट्र यशा ! " २७७
" मुकुला मग तूं कां ना विवाह करिसी तरी ? "
" तुझ्यासम न कीं माते आत्मप्रत्यय अंतरीं ! २७८

यद्यपी राष्ट्रधर्मांचा बीजमंत्र विवाह रे,
गंगाची आटतां गंगास्नान–पुण्य कसे घडे ! २७९
परंतु परतेची जैं आपदा प्रिय भू छळी
धर्मार्थंची सख्या होती आपद्धर्म तदा बळी. २८०
अर्धभुक्तचि तैं अर्धांगीच्या बाहुलतेंतुनी
होयरे सखया जाणें हाय ह्या विषमीं रणीं. २८१
भीति धीटहि तैं द्याया प्रीतिचा असल्या हवीः
चळती अचलांचीही शिखरें पडतां पवी. २८२
पुण्यही श्लाघ्यही होती तैं वैवाहिक बंधरे
आत्मदुर्बल जे माझ्यासम, घातुक त्यां स्वरें. २८३
रोग्या पौष्टिक तैसें त्यां रतिमंगल वर्ज्यसें:
प्राप्तीची न तयाचा कीं त्याग दुष्करसा नसे. २८४
चुकोत अल्प धर्मी ना महद्धर्म करावया
म्हणूनि विहिताची कीं अविवाहितताचि यां २८५

“ परंतु जो मनस्वी हे दोन्हीं धर्म शके करूंः
कामिनींच्या कटाक्षांहीं, जातां येअि न जो धरूंः २८६
धर्मवीर्यत्व तीसंगें ज्याचे लुप्त न जो परी
तिलाचि अपुल्या संगीं धर्मवीर्यवती करीः २८७
धन्य धन्यचि तो धीमान् धर्मवीर चितोरचा
राजीवाक्ष अयोद्ध्येचा, तान्हा[1] भारतभूमिचा !! २८८
तूं मुकुंद ! तसें व्हावें, होअूं तूं क्षमची तसें,
विश्वास हा मनीं माझ्या, आकांक्षा मजही असे ! २८९

---

१ तानाजी वीर.

आमुची देशभक्ती तों निर्नदीकसरोपमा:
तुझी जयांत जन्मा घे गंगा संतत त्या समा ! २९०
धर्मार्थ अेकची त्यागूं आह्मी प्राण: तुम्ही परी
कान्ता, सुतां, स्वतां: आत्मत्याग हा त्रिगुणें तरी! २९१
ध्येय मी राष्ट्रभक्तीचें क्वचित्: जीवन हो तुझें
पितृत्वाचें, पतित्वाचे, ध्येय राष्ट्र सुभक्तिचें ! २९२
"व्यक्तिसख्याचि तूं माझें काय ते पुसशी तरी:
मत्सखा मत्सखी तूं ती संगमूनि परस्परीं २९३
द्विविधा प्रीति अशी माझी मिश्र कामरसाग्नीं
धृतैक-तनु कीं यावी चुंबिता कुरवाळुनी ! २९४
शुद्ध-संचित-तेजस्विधृतवीर्य कुमार तूं
योग्य दीक्षित कामाचा सांग हा करण्या क्रतू ! २९५
धर्माज्ञा, जा ! मदाज्ञा, जा ! माझिची कमला हृदीं
ठेव जा ठेवशी आलिंगनाच्या कुलुपामधीं !!" २९६
'मुकुंदा ! मुकुला !' अैशा हांका मंजुळ तों तिथें
नाचनाचतची येती बाळा सुंदर आणि ते: २९७
आअीनें जी मुकुंदाच्या प्रेमानें प्रतिपाळिली
प्रेमला कमळेचीची सुभगा भगिनी जुळी. २९८
'मुकुंदा ! मुकुला !' बोले ती, 'आला छगुनी न रे
अेकली सोडुनी माते ! आतां जाळ कुठें बरें ! २९९
कुठें ? कुठें ?' तयां अेक्या कमळें वदनावरी
मंजु मारित ती ताळ प्रश्नांचा अपुल्या धरीं. ३००

---

१ अविवाहित देशभक्तांना संतति रूपानें देशभक्तांची संतत परंपरा निर्मिण्याचें पुण्य लाभत नाहीं. वाहती नदी अुपन्न न होणाऱ्या सरोवरासारखें तें जीवन होय.

२ त्यांच्या अपत्य रूपानें.

मुकुंद "कमळांचा कीं,' वदे, 'गंधाचे गोडसा:
परी आज कळे त्यांचा स्पर्श त्याहुनिही तसा!" ३०१
"खरें, खरें!' हसे व्यंगें चतुरा 'कळलें तुला
न्हातांना तें? अणीं रातीं ते कळेल पळोपळा! ३०२
गोड गोड असा ज्याचा स्पर्श लागतसे तुला
त्या तुझ्या 'कमलेंची' कीं असे धाडियलें मला: ३०३
ताजीं ताजीं फुलें वेचूं. पुसे मी आणि जै तितें:
कशासी कमळे गे तीं? तैं किनी मज ती वदे: ३०४
'सांजे जाणे न कां देवदर्शना मज सत्वरीं
श्रीराममंदिरीं!' 'ना श्री काममंदिरिं: सुंदरी ३०५
कमले, कामदेवाच्या दर्शनासि!' हसूनि मी
वदे तों, मुकुळा, भारी रुसे ती--मनिं तोषुनी!" ३०६

"श्रीरामपूजनीं आम्ही पाहिली तुज ना कधीं
अशी तत्पर तूं पुष्पें वेंचूं आजि तरीच तीं! ३०७
रुससी? प्रेमळे, आतां तूंच ना वदलीस कीं
कामपूजन हें आजी? वेंच, वेंच, निकीं निकीं' ३०८
हसे मुकुल: 'कीं भाते पूर्ण पुष्पधनू तरी
कमलेसचि ना विंधूं शकेचि तुजही परी!!" ३०९

तों क्रोध कोण ये! जातीं तीं सुमें चिरडूनिची:
दिसूं अूष्ण शिवूं शीत ज्वालाची सुटली तशी: ३१०
बांक ते लव ते लाखों! अहा कोण शके धरूं
आतां वेलीलतांतूनी अुडतें फुलपांखरूं! ३११

'प्रेमले ! प्रेमले !' हांका मुकुंद मुकुले किती
मारिल्या, विमल्या केल्या, अंके कोण तयांप्रती ! ३१२
जाती तिला धरूं दोघे, परंतु चपला झणीं
निसटेचि पुढें: त्यांसी प्रेमें कर्षित मागुनी. ३१३
'घे तरी चुकलों, याचूं क्षमा, थांब !' असें तिला
वदतांच पदीं ओंचा गुंततांहि न, गुंतला: ३१४
आणि ती धरिली त्यांनीं ! परी पाहुनि गाल ते
अुन्हांत मुकुळाचे सस्वेद ती बहु हांसते: ३१५
'श्रमें, मुकुंद, यांहीं ये घाम या मुकुळा तुझ्या:
बोलसी वीर हा गाढा रणिचा अुदगीरच्या !' ३१६
'मीच कां, प्रेमले' बोले मुकुंद 'रणदक्षते
स्वयें वीरवर श्रीमान् भाअू त्या अवलोकिते: ३१७
जैं घुसे त्यांचिया शब्दांसहची शरसा झणीं
पाडी म्लेच्छांचिया सेनानीचेची धड हा रणीं !' ३१८
'असेल पाडिलें' लीलावती ती हसली, 'धडा:
छाटिलें आधिंची कीं तें असेल कुणि तच्छिरा !" ३१९
"शीर्षहीनहि होअूं दे: पाडिले धड मी तरी:
भरेल तुज तों पाहूं धडही धडकी परी !" ३२०
हंसे मुकुल असें; तों त्या सावेश विलासिनी
वदे "दे बघुं ती माते तलवार तुझी झणीं ! ३२१
दुर्गा तशीं रणीं घेते मंडलें बघ ! दे मला
तेजस्वी तो अणी घोडा श्रीमंतें दिधला तुला !" ३२२
"तोचि घे तोचि हो घोडा प्रेमले !—तुज घेअुनी
पुढें, जोडिस बैसुं जै वरातीस मिळे कुणी !! ३२३

तलवार अणी माझी? ते दुर्गेसमची जरी
हस्त आठ तुला होते पेलती तुज ती तरी!" ३२४
"'पुरें हो तें पुरें' ओढी करा ती मुकुळाचिया
बाही सारूनिया त्याची, गुंफुनी स्वकरीं तया, ३२५
वदे हांसत "ये तूंची, मुकुंदा, वद तत्वता
कीं या जोड करांतूनी कोणाचा कर कोणता?" ३२६
आणि कैशोर–फोळें जें गोल, गोंडस, गुंफले,
निष्कळंक करांचे ती अुचलूनि धरी जुळें: ३२७
त्यांत रूपें कळे कैसें कोणाचा कर कोणता
कैशोर–कुड्मळा माजी स्त्रीपुंकेसर झांकतां! ३२८
'कोणता कर कोणाचा' मुकुंद हसला, 'अहा!
प्रश्नची हा नुरे वेडे या पाणीग्रहणें पहा!" ३२९
शुक सारस मैना तों मोर बुलबुल बोलले
"ठीक ठीक! स्वयंपाणिग्रहीं द्वित्व कसें अुरे!" ३३०
"अर्धांग हाहि ही अर्धांगिनी, यांसि अनंगतो
पूर्णांग करो!" आले वारे मंजुल गात तों! ३३१
संकल्प झारिनें कारंज्याच्या सोडिति अप्सरा:
पिलांचा अिंद्रचापाच्या थवाही बहु नाचला: ३३२
मंगलाष्टक गीतें तों गाति कोकिलः ढाळिती
ताज्या गुलाबपाण्यासी गुलाबलतिका किती: ३३३
अत्तरांच्या कुप्या आणी आपुल्या अुघडूनिया
मालती निशिगंधांच्या कलिका सरसावल्या: ३३४

---

१ पाणिग्रह='हात धरणे': श्लेषार्थी 'वरणें'.

फेंकिती अक्षता वेली फुलांच्या: तरु डोलले:
अर्धांगिनी, अहा अर्धांगिनी ! बुल बुल बोलले !! ३३५
सृष्टिची सगळी ऐशी विनोदें हंसतां तिशीं
प्रत्युत्तरें तिनें द्यावीं कवणा कवणा कशीं ! ३३६
आणि त्यांत कळेही ना सृष्टि बाह्यचि हें वदे
अंत:सृष्ट्युत्सवासी कीं किंवा केवळ साद दे !!! ३३७
तों वरी मखरांचीया कोंनळ्या कदलींतुनी
लवूनि कमला पाहे जसा चंद्र नभांतुनी ३३८
'आल्यें, आल्यें ! अहा सोडा ! बोलवी कमला !' भलें
विनोदसमरा सोडूं मानानें तिज फावले ! ३३९
घालिती तिज मध्यें; ते तिघेही मग चालले
तिने कटींसि दोघांच्या गुंफितां कर कोवळे. ३४०

*
* *

रात्र होतां, फराळाशी जोडपीं नव बैसतां,
तांबूल सोडतां ओठीं गोड ओठहि लागतां: ३४१
असा दिनभरी भावें देव जो नव अर्चिला
मनोभव मनीं साक्षात् प्रभु प्रकट जाहला ! ३४२
ती स्व–स्व–प्रथमतूंच्या शांतीची स्मृतिही अणी
कामव्याकुळ तैं साऱ्या करी कामुककामिनी ! ३४३
पूजका प्रमुखाची जी मदनोत्सव मंदिरीं
त्या व्रताची--व्रतस्था ती कोमला कमला परी ? ३४४
—गूढ अद्‌भुत कांहीसे घडणार अतां खरें:
अतर्क्यसौख्यभीतीचीं हृदयंगम वादळें: ३४५

लज्जा अकृतिमा देहीं दे स्वेदोद्गमही जरीः
सत्वशीलवतीच्या त्या तरी सात्विक अंतरीं ३४६
जडसें, विषयी असें, तमोपहतसें नसें
किमपीहि! शिवावें हो तिला अशिव तें कसें! ३४७
तिच्या आवडत्या त्या त्या लतांची विणली फुलें
प्रेमलेनें जव्हां तीच्या अलकीं अपुल्या करें: ३४८
पाच माणिक मोत्यांचे अलंकारहि टाकिती
तन्मुखावरुनी ओवाळुनी स्वकिरणें जधींः ३४९
नमस्कृता वदे आणी श्वश्रू चुंबुनि तीं जंव
'अष्टपुत्रवती वत्से, जा! सौभाग्यवती भव!!' ३५०
झणी तो तंव तत्चित्तीं सासूचा प्रिय 'जा अतां'
नवीन जगतें दिव्यार्थांची जागवि अकतां! ३५१
शुभाशीर्वचनांचा तो वर्ष न्हाणवली वरी;
त्या देवमंदिरीभूता पूजा ती मखरांतली, ३५२
ती होमदीप्ति, ते धूम स्वच्छ, आहुति गंध ते,
श्रुतिमंगल ते दिव्य श्रुतिमंत्र निनादते, ३५३
अभ्यंग स्नान तें, अंगस्पर्श, तीं ललनास्मितें,
पुण्य ब्राह्मणपंक्ती त्या, दक्षिणादिक दान तें, ३५४
आहेर ते, विडे ते, ते उखाणे, फुलसेज ती,
आल्हाद अिष्टमित्रांचा, अलंकारवित्या सतीः ३५५
सोहळ्यांहीं विधींहीं ह्या तया न्हाणवली वरी
पृथक् पृथक् मनीं झाले जे संस्कार पलोपलीं: ३५६
होतांचि स्पर्श त्या 'जा'चा प्रेम पावन—सर्व या
धीरोदात्तैक संस्कारीं जाती अेकवटूनिया!— ३५७

कीं देवांहीं द्विजांहींही महत्कार्य करूं कुणी
निर्वाचिता मला केली ! नियुक्ता मजसी अणी ! ३५८
अिष्ट जें पितरांचे, जें हृष्टवी अखिला मही,
जयाच्या विजयासाठीं व्हावे लुब्ध विरक्तही, ३५९
लोककल्याण साधूं तें–सुख केवल ना–परी
अग्निसाक्ष सख्यासंगें कायसें व्रत मी धरी ! ३६०
गोत्रर्षींचे समर्पूनीं नव प्रतिनिधित्व तें
निघालेंचि अहा ही मी जाअूं 'जा' वदती तिथें ! ३६१

सोल्हास ती अणी जाअूं निघालीहि तिथें–परी
कासया कमले ?–हारे मदना ! गति खुंटली ! ३६२
लोटिली ती सख्यांनीं तों बळेंचि पतिमंदिरीं
पुढें मन, पदें घेतां मागती बरचेवरी ! ३६३
लाविलीही कडी त्यांनीं: द्वारा व्यर्थचि मारिशी
मुग्धे धके ! न तूं अेके पदांचे, परि जा कशी ३६४
अैक तूं स्वमनाचेंची कमले कमनीय, जा—
प्राणवल्लभ बोलावी, जा, युवा जिकडे तुझा !! ३६५
पुण्य मंचक शय्या ही: बैस बैस शुभे न भी:
चुंबितां कां मधेंची तूं राहसी सुटुनी अुभी ! ३६६
बैस सेजेसि ये तूं ये: स्वयें जनककन्यका
स्पर्शली जीस ती झाली रतिसेज न धन्य कां ! ३६७

देहधर्म कसासाची ? : पावने प्रकटे अशी
स्वर्गंगा जीवनाची ही, हे गंगोत्रि, तुझ्यांत जी ! ३६८

ओपो हिरण्यगर्भा त्या स्वयंभू भगवान् स्वयें
नारांत ज्या: झरा त्यांचा नारि अेक तुझ्यांत ये ! ३६९
तीर्थांची अुगमा घेअी तीर्थता सज्जनांत; ते
तुझ्यांत: तूं अृतुस्नाते तेथेतेसहि तीर्थ तें ! ३७०
तरि घाल फुलांची ती माळ त्या आणि नंतरी
फुलांहूनि मअू माळा करांची निजसुंदरी ! ३७१
फुलांहूनि मअू आणि साखरेहुनिही मिठी
कंठि कोमळ त्या घालीं प्रेमाची प्रमदे मिठी ! ३७२
गोड, गोड, मिठी ? वेडे, पुढें त्याहुनिही अहा
आलिंगनामृतीं गोडी : पिअुनी तर तूं पहा ! ३७३
अंगीं अंगीं समालिंगी ! विलंब पळ ना करीं :
कीं असामान्य गे देवी पळ हा ! असल्या पळीं ३७४
—सांगावें तें कुणी कीं गे नसतीलाचि तीं अुभीं
मंडलें नागकन्यांचीं पाताळीं अणखी नभीं ५७५
अप्सरांचीं धरूनीयां करीं मंगळ आरत्या:
लावुनि सनया ओंठा देवदूत ततीहि त्या: ३७६
प्रतीक्षत पळा ह्याची धन्य ! याचि पळा क्वचित्
वर्णितील कवी भावी ' शुभशंसि ' प्रसन्न दिक् ' ! ३७७

---

१ ' अप अेव ससर्जादौ तासुबीजमवासृजत् ' त्या सृष्टीचें मूलबीज धारण करणाऱ्या अपांना नारा ह्मटलें आहे. ' आपो नारा अिति प्रोक्ता ' मनुस्मृतींतील ह्या वचनांचा हा उल्लेख आहे.

२ अनेक जलाशय त्यांचे कांठीं कोणी प्रख्यात पुरुष राहिला ह्मणूनच तीर्थ ह्मणून पूर्वे प्रख्याति पावते जाहले.

३–४ बभूव सर्वे शुभसांसि तत्क्षणं ! ' ' प्रसन्न दिक्पांसु विविक्तवाता ' प्रभृति कालिदासाच्या काव्यांतील श्लोकांचा हा अुल्लेख आहे. महापुरुषांच्या जन्माच्या स्वागतार्थ अशा घटना घडतात असे पौराणिक संकेत आहेत.

कीं, कल्याणि, पलीं या जीं ओवुनी हृदयें हृदीं
प्रेरी अनंग पेराया अमृतें अमृता मधीं ३७८
—सांगावें कुणि !—त्या दिव्या पेरणींतचि संभवा
घेणें असेल अेखादा घनश्यामल रामः वा ३७९
कालेंचि ना गुणेंही जो ठरे आद्यकवी महा—
कवींत वसुधेमाजी, आजी त्या सम अन्य हा ३८०
वाल्मीकि वाः कुणी गीता द्रष्टा वा नवसारथीः
वाङ्मी बृहस्पति शिल्पीमयः भीष्म महारथीः ३८१
किंवा मदालसा, मुक्ता, मीरा वा विदुला कुणी
लावण्याची लता किंवा अुमा देवविमोहिनी : ३८२
वा कुणी विश्ववेधांचा मनु भास्कर[1] नूतनः
आश्चर्यांच्या अजिंक्याचा निर्माता, नट, नर्तन, ३८३
नाट्यकार कुणी किंवा लोकीं अद्भुतसा नवाः
आसन्नमृत्यु राष्ट्रेंची राष्ट्रें ज्या प्रतिभेंत वा ३८४
नवजीवन पीती तो चंद्रगुप्त, अमात्य[2] तो,
विक्रमादित्य वा ज्याचा म्लेंच्छा विक्रम मर्दितो, ३८५
हिंदु छत्रपति श्रीमान् शिव, वीरवराग्रणी
गुरूगोविंद वा बंदा धर्मवीर नवा कुणी— ३८६
मंगलाची परा सीमा ! पेरणींतचि संभवा
घेणें असेल या दिव्या देवभूमि तुझ्यांत वा ३८७
जन्मजन्मांतरींची यत्तपः सिद्धि फलोन्मुखा
राहिली या क्षणाचीची वाट पाहत अुत्सुका ३८८
आत्मा अंतिम जन्मासी मुक्त भोगुनि व्हावया
बुद्ध, जीजस, वा जीवन्मुक्त देहुं[3]तेला तया !! ३८९

---

१ भास्कराचार्य. २ चाणक्य. ३ देहूचे तुकाराम.

प्रेयाच्या स्वर्गं गे स्वर्ग श्रेयाचाहि लुटूं तरी
सख्या समुपभोगीं तूं घट्ट ह्या हृदयीं धरी ! ३९०
न अंग सुभगे चोरी : निर्विकल्प समाधितें
बीजसाधन हें कामासन ! तूं रत हो तिथें ! ! ३९१
आणि पंचशरा ये ये: पंचही शर या पळीं
मार रे सुकुमारीं या मन्मथा मिथुनावरी ! ३९२
झटशील असें साधू शुभची सुमकार्मुका
काम, कामा, तरी तूझा करी शंकर राग कां ! ३९३
घेच संमोहनास्त्राही घेच खेंचुनि या पळीं:
मुकुंद कमला, घे घे, समाधिस्थ परस्परीं[1] ! ! ३९४
विमानांत अहा आलिंगनाच्या रतिमूर्च्छितां
अुंच अुंच अनंगा ने सुखाच्या गगनांत त्या ! ! ३९५
मंजु मंजुळ गीतांच्या नव निर्झरती सरी:
चंद्रिका—चंद्रकांतांचे रस स्नेहरसांतरीं !!! ३९६
हांसल्या लतिका आशीर्वाद मंगळ तेधवां:
शुभे हो शिव हे तूंतें नवें वर्ष[2], ॠतू[2] नवा ! ३९७

* * *

---

१ परस्परीं:—ध्यान समाधींत स्वतःचें मन स्वतःतच समाधिस्थ होतें. पण त्या कामसमाधींत मने अन्योन्यीं रममाण होअून " परस्परीं " समाधिस्थ झालीं; तन्मयता सायुज्यता पावलीं.

२ नवें वर्ष:—मागें अनुष्टुप ११२ ते ११५ मध्यें दिलेला आशीर्वाद असा त्या शब्दांच्या दोहीं अर्थी आज खरा ठरला ! तिथें ' नवे वर्ष ॠतू नवा ' ह्याचा कालवाचक अब्द आणि ॠतु हा अर्थ मुख्यार्थ होता: अिथें त्यांचा श्लेषार्थ अभिप्रेत आहे. नव्या ' ॠतू ' च्या मंगलशांतीप्रीत्यर्थ होणारा हा चंद्रिका चंद्रकांतांच्या स्नेहरसांचा आंतर ' वर्ष '—वर्षाव—शिवास्पद होवो !

प्रेयाच्या स्वर्ग सोडोनी, सुखाच्या गगनांतुनीं
कर्मभूसि पुनः येशी हेंचि कीं सुचवूं झणीं ३९८
भीत भीत दुरोनिया वारे वाहत जात ते
अश्वांच्या थयथयाटाची ध्वनिती पडसाद ते ! ३९९
अश्व ? सुस्पष्ट ह्या टापा ! कुणाचे ? सहसा कसें ?
तोंच शय्यागृहद्वारीं थापही हळु येतसे !— ४००
'मुकुंदा!' थाप आली ना दार तों अुघडूनिया
मुकुंद पडला प्रेमें गळ्यांत मुकुळा चिया ! ४०१
"स्मृति प्रिय तुझी आतां होती होतचिः ये अहा!"
"प्रिय ? ना! परि ये कथुं अप्रियची हतभाग्य हा! ४०२
मुकुंदा वाच तूंची ही राजाज्ञा ! मज दर्शनी
निघणेच रणा!" "आणी मलाहि, तरि, या क्षणीं! ४०३
रणीं ना पडले शिंदे? मराठा तरी कोणता
दत्ताजींच्या न सूडासी जातां राहिल मागुता!" ४०४
"मुकुंदा त्यांतही शत्रू म्लेच्छ येथीलची कुणी
दुर्वांता अैकुनी अैशी बंडाअी करण्या झणीं ४०५
रानांत होत आहेती जमा याचि, तयां प्रती
दंडायासी त्वरें आज्ञा श्रीभाअू मज सोडिती. ४०६
ह्मणूनि या मुहूर्तींची छापा घालुनि तोडितों
असावधचि या रानीं जों ना संहत शत्रु तों, ४०७
अुद्युक्त अश्वसंघांचे आकळूनि लगाम रे
वाट पाहति आज्ञेची शिलेदार घुसूं पुढें ! ४०८

हसशील तसा जातां: म्हणूनि तुज भेटूनि
आलो जाऊं" "अणी मातें काय मागति ठेवुनी? ४०९
नाहीं, नाहीं, कधीं नाहीं! मराठा नचि काय मी!"
परी मुकुल ना बोले संकोचें हृदयीं श्रमी. ४१०
अधोवदनची अंतीं प्रेमगद्गद तो पुसे
"जागे, मुकुंद, कीं माझी कमला निजली असे?" ४११
"लागला लव कीं डोळा आतांची." "तरी कोंवि तें
त्यागूं आतांचि ती व्हावें शिळानिष्ठुर या हृदें! ४१२
सुखस्वेदज बिंदूंची बिंदी डोलत राहिली:
प्रेमसेजे न जों आली नीज ही पहिली पुरी! ४१३
तोंच सोडुनि जावें त्वां मुकुंदा कमले कसें
फेकावें तें कसें आगीमधेंचि कमला असें!" ४१४
"आगींतही असें फेकूं कमला न अयुक्त कीं
जरी प्रज्वलली ती कीं देवकार्य—महामखीं! ४१५
मुकुला सखया तूंची बदलासि सरावरीं:
धर्मार्थंची कधीं होती आपद्धर्म असे बळी! ४१६
शत्रु शत्रु दिशा दाही फिरंगाण तुराण तों
थेट श्रावणकोराच्या रेपर्यंत अहिंदु तो! ४१७
तो तो सर्व मिळूनीयां विच्छेदूं अुठला अहा
शिवछत्रचि हिंदूंचा त्राणप्राण अनन्य हा!! ४१८
अहिंदु अुठला सारा!—हिंदु जो तितुका अणी
काय पाहोंचि तें शय्यागेहांच्या खिडक्यांतुनी! ४१९

अुठो हिंदुः अुठो वा नाः मराठा तितुका तरी
आबालबालिका आतां मरो मारित संगरीं ! ४२०
समर्थांची अम्ही दीक्षा घेतली नचि कां ? झणीं
हातावरी शिरा तूंही घेअुनी घुससी रणीं ! ४२१
सरदारचि तू वीरा श्रीमंत प्रभु भाअुचाः
तरी मींहि नसे कांरे देहची दुसरा तुझा ? " ४२२

तोंचि शीळ हळू आली ! आली स्फूर्ति हृदीं, मुखीं
वीरश्रीची प्रभा आली वीरबाहु फुरोनि कीं. ४२३
" अहा ! ' मुकुल तों बोले पाय टाकितची पुढें:
' सर्व सिद्ध असे सांगू अेक शीळ सख्या सुटे ! ४२४
विलंब पल ना आतां शक्य ! हूं चल तूं !—परी
मातेसी वा बंधू येना पलही कमला पुरी ! " ४२५

आणि सद्‌गद ते दोघे देवद्वारिं तसे झणीं
द्वारीं शय्यागृहाच्या त्या सकंप कर जोडुनीः ४२६
वदे मुकुल " देवा तूं आमुच्या कमले अणीः "
" आमुष्या प्रेमले देवा " मुकुंद वदला झणीं: ४२७
" आमुच्या प्रेमले आणी कमलेप्रति ' बोलती
दोघेही ते; ' प्रभो रक्षा ! प्रार्थना अितुकीच ती !! " ४२८

राजीवलोचनांची ती यौवनोदय भास्करा
जोडी जिवलगांची त्या साश्रुही करुनी त्वरा ४२९
निजल्या न जिन्यांसीहि कळतां अुतरे जिने,
अुल्लंघिती गृहा—ज्यारे फिरुनी कधिं पाहणें ! ४३०

अुच्छृंखलाश्वसंघांचे लगाम सुटले ढिले,
रान आले, अहा झालें ! स्वार ते सरसावले ! ४३१
खिंकाळतो न घोडा वा स्वार श्वास न टाकितोः
तळावरी पडे छापा रिपुच्या सहसाचि तों !! ४३२

धडड धडड आगी बंदुका ओकती तों !
तळपति तलवारी ! अेकची गर्ज होतो !
सुटुनि न घटि होत्ये प्रेमशय्या जयातें
क्षण रण गमलें त्या—सत्यही स्वप्नसें तें !! ४३३

अणि भडकुनि शय्यादीप दावाग्नि माते !
वमति रुधिर रंग प्रीतिचे ! बाग पेटे !
दयित ! बकुल ! हारे ! क्रंदतां तो न भेटे !
शयानिं भिवावि होतें—स्वप्नही सत्यसें तें !!! ४३४





## गानफुलें--पगडी २ री

# विरहोच्छ्वास !

(विरहाचे सुस्कारे !!)



मी शब्द लिही: अर्थ त्यांतला आणी ||
जे पुसुनि नयनिचें पाणी ||
तरि, विरहा, त्वद्दंश पाजवी ज्याला ||
तव मिष्ट विषाचा प्याला ||
या पाण्याच्या तोचि पिवो अनुपाना ||
ही शपथ असे मित्रांना ! ||

(सन १९२३ त प्रसिद्ध झालेली ह्या गीतांची प्रथमावृत्ति.)

# विरहोच्छ्वास !

## ( विरहाचे सुस्कारे ! )

[ परिचयः—' कमला ' काव्यांत मुकुंद आणि मुकुल या ज्या दोन भूमिका आलेल्या आहेत त्यापैकीं मुकुलाचा पुढचा वृत्तांत असा वर्णावयाचा होता कीं तो वीर युवक आपली शूर दयिता जी प्रेमला तीसह हिंदुपद पादशाहीसाठीं लढतांना तिच्या तुकडीची ताटातूट होऊन मुसलमानांचे हाती एकटाच ससैन्य सांपडतो. आणि मृत्युदंडाची अपेक्षा करीत काळकोठडींत बंदींत पडतो. त्यास छळून शरण आणण्याचा आणि त्याजकरवी स्वधर्म द्रोह करविण्याचा यत्न शत्रु कधी मृत्यूच्या धाकाने तर कधीं त्याच्या दयितेच्या भेटीच्या आमिषानें करीत असल्यामुळे त्या शत्रूस आपले विरहव्याकुळ केविलवाणें पण दिसून येऊं नये आणि आपल्या सहसैनिकांचाही धीर सुटूं नये म्हणून तो वरवर कठोरपणा धारण करून आपल्या दुरावलेल्या प्रियजनांची वास्तपुस्तसुद्धां करीत नाहीं. परंतु वीरकर्तव्यास्तव धारण केलेल्या कठोरपणाचे कवचाखालीं त्याचें प्रेमळ हृदय पूर्वीच्या प्रिय संगतीची सुखें स्मरून स्मरून विरहानें सारखे झुरत होते—मनांतल्या मनांत त्याचे व्याकूल अश्रू सारखे झरत होते. त्या दुःखोद्वेगास हलके करण्यासाठीं त्याच्या त्या प्रेमव्याकुल हृदयाने जे सुसकारे टाकले त्यांचेच पडसाद हीं गीतें झालीं !

तें मूळ पानपतचे काव्य अपुरें राहिल्यामुळें त्यांतील, मागील ' कमले ' च्या सराप्रमाणेंच, हा सरही विलगपणेंच, पुढें दिला आहे. अर्थात् त्यांत सूचित केलेल्या सुट्या घटना—ज्या मूळ काव्यांत सविस्तर वर्णावयाच्या होत्या त्या—आतां वाचकांस, ह्या सोयीसाठींच भरपूर दिलेल्या पायटीपांच्या आधारें तर्कानेंच काय अनुमानितां येतील त्या येतील. ]

———

# विरहोच्छ्वास

( चाल:--अजि अक्रुर हा० )

हा हाय तुझ्या गोड गातची गाना
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ घृ० ॥
सुमकोमळशा प्रेमिं अनंतीं तुजशी
हे प्रीति, धरुनि हृदयाशीं:
हा कांहिं असे काळ ह्मणुनि या जगतीं
विस्मरुनि होहि गे वृत्तिः
जों दंग अह्मी संगसुखासव पीतां,
अनुभवित पळीं शाश्वतता,
हा हाय विरह तों आला !
प्रेमाच्या आनंत्याला
आरोपुनि[1] त्याच्या काला
जरि अंताला । अह्मि तया पळा
विसरलों ! तरी अंत अह्मां विसरेना !
छळि विरह वेदना प्राणा ! ! ॥ धृ० ॥

---

१ आरोपुनि:—जें अनंतसें वाटलें त्या प्रेमाच्या त्या अनंतपणा-प्रमाणेंच तो समागमकाचा पळही अनंतच आहे असा भास झाला. प्रेम अनंत असलें तरी पळाला अंत असतो ह्या गोष्टीचा विसरच पडला !

4

॥ २ ॥

सखि, नेतां ते दुष्ट दूरवुनि तूंतें
जातांहि पुढें लव परतें
कां ओझरत्या दाविलेसि ना मजला
कमलाक्षि तुझ्या मुखकमला !
'स्मर कंठि तुझ्या पडुनि बोलत्या बोलां
अश्रूंत करित त्या ओला !'
हे समाधान तव खोटें
त्या पाहण्यांत ओझरतें
ना प्रेम निरखिण्यांतहि तें
आणि लोलुपसें ! मजवरिच तसें
जन बघो तुलाः ह्याहि वांछिले माना !
छळि विरह वेदना प्राणा ! ! ॥ धृ० ॥

॥ ३ ॥

ना लागेना गोड अतां मज कांहीं !
मज कुठेंहि करमत नाहीं !
ये विजना त्रासूनि जनीं मी आणी
त्रासूनि जनां मी विजनीं !
मी केश पुन्हां विंचरीं, पुन्हा विखुरीं !
विस्मरत गोष्ट जी स्मरली !
फिरफिरुनि तनू लव बसतेः
बघबघुनि नेत्र लव मिटतेः
परि हाय अनुक्षण मन तें
झुरझुरूनियां ! झुरतेंचि ! तया—
पळ विरम नसे; करित सखि तुझ्या स्मरणा !
छळि विरह वेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

॥ ४ ॥

फुलतांचि फुलें सहज खुडीं मी मोदें:
हा तोंचि चुरमळूं खेदें !

कीं ' खोंवु फुला केशकलापीं तव ये: '
तुज बाहुं कुठें अजि सखये !

तव पूर्वीचे प्रेमदूत[1] दिसतां ते:
हंसतचि झुरे मी खेदें !

या अिष्ट जनीं समजवितां ' लव खाअी '
लागली भूक ही जाअी !

स्मरत कीं कसें म्या रुसुनी
बसतांच तुवां मन धरुनी
तव कवल देत मम वदनीं
मृदु पालविले । मधु कालविले:

मधु अधरीं तें ! करित अमृत जें अन्ना !
छळि विरह वेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ प्रेमदूत:—पूर्वी हे प्रेमदूत तुझा संदेश आणीत त्यायोगें त्यांचे दर्शन होतांच आनंदानें हसूं येअी. ती सवय झाल्यानें आजही ते दिसतांच सवयीचें हसूं येअी पण लगेच आतां तुझा निरोप त्यांच्याबरोबर येणें शक्य नाहीं ह्याची आठवण होअून मन झुरूं लागे.

॥ ५ ॥

घे रुचीच जैं वत्स धेनुका चाटी ।
अुपचा[1]र रीति त्यां नचि ती ।
त्या रुचिची वा चंचु चंचुला पाजी
ज्या मोह—शरबता त्याची;
वा द्राक्षांची, आम्रफलांची, मधुची;
चव तशी भिन्न अधरांची ।
आणि द्राक्ष, आम्रफल, मदिरा,
जो अधर यौवनें रसला,
त्या सकलांहुनि तव अधरा
अधिकाचि गोडी ! । पिअुं दे थोडी
मज पुन्हां ! पुन्हां अेक तरि मुका देना !
छळि विरह वेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ अुपचारः—गाय वासराला जी हुंगते ती प्रीति व्यक्त करण्याचा अेक केवळ औपचारिक संप्रदाय म्हणून नव्हे. तर तिला वत्साचा अेक विशिष्ट आणि अिष्ट असा प्रत्यक्ष वासच येतो. त्या हुंगण्याच्या सवयीचेंच रूपांतर मनुष्यांमध्यें पुढें पुढें अवघ्राणाच्या अेका औपचारिक रीतींत झालें. चुंबनही प्रथम प्रत्यक्ष रुचींतच अुत्पन्न झालें. गाय वासराला चाटते, हुंगतेः त्यांतील प्रत्यक्ष स्वादामुळें पशूंना आनंद होतो.पुढें आनंद होतांच साहचर्याच्या बळें तो स्वाद आल्यासारखें भासूं लागलें. पुढें तो तो विशिष्ट प्रत्यक्ष स्वाद घेण्याअितकीं मानवी अिंद्रियें सूक्ष्मग्राही राहिलीं नाहींत तरी प्रीतीचा आनंद व्यक्त करण्याची ती पद्धत रूढ होअून बसली. प्रत्यक्ष भिन्न रुचि देणारें चाटणें, हुंगणें, चंचूनें चंचूंत घास घालणें, त्याचेंच रूपांतर चुंबन अवघ्राण अधरपानादिक मानवी प्रेमव्यक्तीचे अुपचार होत. ही त्यांची मानली गेलेली अेक अुपपत्ति अिथें सूचित केली आहे.

॥ ६ ॥

रे मंजु मुक्या ! तोचि मुका[1]: जो पहिला
हतकाम मुका तुज वदला !
श्रवणेंचि न तो बधिर हृदेंही ! तवही
ज्या गीति ना श्रवूं येअी !
रति देवीच्या चटुल मुखा ! तूं न मुका:
तूं मुखरविसि रसां अमुखां !
वाङ्मनाहि ना सहुनि मूर्च्छना दे ती
तुजमधुनि हृदयलय गीती
आजन्म मुके अकवीति निज वचनीं
आजन्म बधिरशा श्रवणीं !
मुरलींत[2] त्या न जें सरलें
जें मेघदूतिंही अुरलें
ज्या ताजमहाल न पुरले
तें तूंचि सख्या ! वदतोसि मुक्या
तूं प्रीतीचा प्रणव[3] ! रतीचा वीणा[4] !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ मुका०:—बोलतां न येणारा. वस्तूचें नीट नांव अुच्चारतां न येणारा

२ मुखानें घ्यावयाचा ह्मणून त्याला 'मुखा' ह्मणावयाचे त्यालाच हे मुका ह्मणतात तरी कसे ?

३ मुरली०:—जें प्रेम कृष्णाच्या मुरलींतून, मेघदूतांतून, ताजमहालांतून त्यां त्या प्रेमिकांना पूर्णपणें व्यक्तवितां आलें नाहीं तें हा 'मुका' अधिक वक्तृत्वपूर्ण वाणीनें आणि अधिक समाधानकारक रीतीनें व्यक्तवूं शकता,—शकतो !

४ प्रणवः—आरंभ आणि समारोप

५ वीणाः—कारण मुका मंजुळ वाजतो.

॥ ७ ॥

ही अुषा जशी रंग खेळतां आली
मी निघे नभीं त्या काळीं.
सरसिजें, सरें, बाग बगीचे, शेतें,
टाकीत मागती ते ते
मी गतिच्याची जात अुत्सवीं—तों ती
तव दिसे मनोहर मूर्ती !
विहगांत न कीं कधिंहि रतीच्या गगनीं
जोडपें तसें ये जुळुनी !
भरभरुनी दे हृदयरसें रसरसतें
चंचूत चंचुही मधु तें !
शतजन्म अुपार्जित पळतो
जो गमे करिं पळे येतो
त्या क्रौंचमिथुनगतिसम तो
जी बद्ध पदीं । दिसतां नचि ती
ती दोरी गे दुष्ट दूरवी अपुणां !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ अुषाः—लक्षणेनें यौवन हा अर्थ.

२ क्रौंच०ः—वाल्मीकी अृषीनें ज्याला विद्ध होताना पाहून हा श्लोक अुच्चारलाः ‘ मा निषाद प्रतिष्टां त्वमगमः शाश्वतीं समां। यत्क्रौंच मिथुनादेकं अवधीः काममोहितम्.—’

३ ती दोरीः—तो नियतीचा पाशरज्जु.

॥ ८ ॥

मी राज्य अणी प्रीति तूं महाराणी !
तूं रत्न तुझी मी खाणी !
मी वेडा तूं चटुल चेटकी आणी
मी मोर मूर्त तूं वाणी !
मी शब्द लिही अर्थ त्यांतला आणी
ने पुसुनि नयनिचें पाणी !
तरि, विरहा, त्वद्दंश पाजवी ज्याला
तव मिष्ट विषाचा प्याला
या पाण्यांच्या[1] तोचि पिवो अनुपाना !—
ही शपथ असे अितरांना !
जें पुन्हां न दिसणें कांहीं
त्या स्तनंधयाचे आअी,
बालिका सासुरा जाअी, ( जी )
विरहिणी, विधुरः हो विरही !
या गीतातें । समसतार ते । तुमचीच हृदें ।
अेकची अहो प्रीति तिथुनि कीं पुण्या !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ ध्रु० ॥

---

१ पाण्याच्या०:—या विरहविकल अश्रूंचा अर्थ त्यालाच प्रतीत होणार ! अितरांना ते असंबद्ध आणि असमंजसही वाटले तरी त्याच्या हृदयांत दाटलेल्या शोकक्षोभास केले तर हेच अश्रु हलके करतील.

॥ ९ ॥

अणि त्यांतहि त्या तरुण वयाची प्रीती:
स्वप्नांत अुषेच्या न्हाती !
मधु तरुण फुलांतूनि झरे कैशोरी !
ज्या अृतूमध्यें हृद्दोलीं
तूं आह्मासी वत्सलाम्रतरु शाखे
देतोसि वसंता[1] झोके !
तें मंजु कसेंसेंचि जें हृदीं होअी
जैं अुंच अुंच तो[2] जाअी !
रूपांत तसेंची हृदयीं
लावण्य भिन्न जों नाहीं।
माधुरी मिसळुनी राहीं
हृदयीं अैक्या । प्रेमानैक्या
ज्या वास वयीं--जेंवि घनीं तीर्थांनां !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ जीवनांचा वसंत:--नवयौवन.

२ तो:--तो हृद्दोल.

॥ १० ॥

त्या वयांतला लोभ आपुला कां ना !
सर्वस्व अेकमेकांना !
तूं सखी स्वसा शिष्य तान्हुलें भाअू
दुःखांत माय समजाअू !
त्या चंडीच्या[1] देअुळांतला माझा
सहतपी रणतपस्येचा !
तेजांत अहा ओतुनिया सिंहांच्या
मोहना ललितललनांच्या
त्या सरसशरबतें भरिला
तव सतत हृदाचा प्याला !—
आकंठ पिअूं बदनाला
माझ्या मी जो, लावियला तों
ये ! तोंचि अहा अूत भूमिकंपांनां[2] !
छळि विरहवेदना प्राणा !

---

१ हिंदुपदपादशाहीच्या ध्येयास्तव जी रणदेवतेची अुग्र आराधना केली त्या तपस्येतील माझा सहतपी, सहसैनिक.

२ भूमिकंप०:—मातृभूस कंपित करणारे राष्ट्रीय युद्धाचे धक्के अकस्मात् बसून सारीच अुलथापालथ झाली ! ओंठाला लागतो तोंच प्रेमाचा प्याला सटून पडला !

॥ ११ ॥

भर दुपारचें ऊनः ऊष्ण सुसकारे
टाकीत तिष्टति वारेः
रागीट धनीः दूर गांवः बड ओझेंः
चालतां पद पथीं भाजेः
चिमुकल्या तया पर्णकुटीशीं तों दिससी
तूं उभी कुमारी मजसी !
मन पाळविशीं जेथ बकुळिच्या खालीं
फुलसडा सेज मऊ घाली
ओतिशी कडेची कळशी
पी भरुनि भरुनि अंजलिशी ( मी )
अणि पुढे निघे त्या सरशी
अधिकाचि बळे, अुः तृषा जळे, त्या तुझ्या जळें !
परतलों पुन्हा !—तेथ चेटकी तूं ना !
छळि विरहवेदना प्राणा !     ॥ धृ० ॥

---

धनी०:—तें ध्येय ! धर्म ! त्या ध्येयास्तव तें देवकार्याचें ओझें शिरावर घेऊन अुग्रकर्तव्य मार्गानें मी चाललों. ( पुढील वर्णनांतही असाच ध्वन्यर्थ अभिप्रेत आहे. )

॥ १२ ॥

अधरांत भरूं, जीव सुके ! दे याला
एकची चुंबनी प्याला !

ये ! कंठि तुझ्या पडुनि झुरे झुलण्याला
ही असूं हसूंची माला !

ठसठसे अहा चेपचेपुनी तान्ह्या
पी हृदांतल्या ह्या पान्ह्या !

जैं जाग मधुनि ये शयनीं
मम कंठि करां गुंफोनी
तुज बघुनि निजेलें, फिरुनी

कधिं पिईन या, हिमकराचिया, नव अुदित तया,
तव मुखावरी मधुर खेळत्या किरणा !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

॥ १३ ॥

हा हाय अतां भेट अह्मांसी कुठली !
आशाहि आजि मज विटली !
तरि काकुळती येत विनविलें होतें
आधींच कां न म्या तैं तें !—
कीं 'भेटीसी हीच अेकली रातीः
ये झणीं नको दवडू ती !'
मी समयांच्या[1] सार सारुनी वाती
पाहिली वाट त्या रातीं !
पद पथें कुणी वाजतांच दचकावें:
दूरतां शून्य बैसावें !
तों दार अहा किलकिललें:
हो तूंचि ! मज झणीं स्वकरें
हृदिं हुंद हुंदुनीं धरिलें !—
(परि मी) विसरुनि रातीं, लवचीं अुरे ती, भोगुं संगतीं,
ढकलिली तुला दूर, धरुनि अभिमाना[2] !
छळि विरहवेदना प्राणा !

---

१ समयांच्याः दिव्यांच्या (समअींच्या): आणि श्लेषानें वेळांच्याः तिसऱ्या अर्थी कराराच्याः कराराची ठरलेली वेळ जसजशी आअूं लागली तसतशी आणखी थोड्या वेळानेंच येण्याचे ह्मणाली असेल, येअील, अशा प्रतिक्षेची आणि समअींची वात सारीत वाट पहात राहिलों.

२ भेटीस येण्यास तूं रात्र संपत येअीतों अुशीर केलास तर मी पण बोलत नाहीं जा ! असा प्रेमळ रुसव्याचा अभिमान.

॥ १४ ॥

ना प्रेमिक हो पळहि दूर व्हा वायां
अभिमानिं ! पडे मी पाया !
बघ बघतचि कीं वाट पळाची या रे
शत रवी विझोनी गेले !
आणि सुकले हो सिंधु कुठें तेव्हांची
क्षणिकांत भेट ही तुमची !
शत अंध वियोजक शक्ती
काळाब्धि मधें आपातीं
केंद्रूनि वियोगावर्तीं
प्रीति पर्व हें, । घे भेटुनि घे
दिग्जयी प्रिया प्रीति रिघोनी शरणा
छळि विरहवेदना प्राणा !

---

१ प्रिय संगमाचा योग हा जितका दुःसाध्य तितकाच क्षणिक ! हीं दोन अंतःकरणें परस्परांस भेटण्यासाठीं किती सूर्यमालिकांतून रूपांतरें घेत घेत आज या रूपांत अिथें अेकदांची अेकमेकांस भेटूं शकलीं ! त्यांतही ‘ संयोगाः विप्रयोगान्ताः ” ! ! यास्तव नसत्या रुसव्यांत—प्रणयी अभिमानांत—दूर न होतां साधल्याक्षणीं चटूकन भेटून घ्या ! तो निसटला तर हा क्षणाचा अभिमान क्वाचित अुभ्या आयुष्याच्या पश्चातापास कारण होईल ! तसा क्षण पुन्हां येणार नाहीं !

२ अभिमान शत्रूपाशीं: स्नेहाचें भूषण शरणागति ! प्रीति शरण रिघुनच काय ती प्रिय जनांना पूर्णपणें जिंकूं शकते.

॥ १५ ॥

अभिमानी तों—दाविताचि पथें मजसी
साशंक तुवां पुसिलेसिः
भ्रू कुंचित, भ्रू वांकवीत पद, वक्षीं
अुपवीत, कृष्णतनु, लक्षी—
हा वादळसा वीज ढगावरि ज्याच्या,
रोधेंचि कवण ये तूझ्या ? ”
हा, प्रीति !, न कां हाय ठाअुका साचा
रागीट हा धनी माझा !
दे बुद्धि अुपजतां मजसी
याच्याचि विकूनी दास्यीं
या वदति धर्म विप्राशी
अुपजतांचि कीं ! आणि मला विकी
हें हृदय तुझ्या, प्रीति ! चुंब्य या चरणां !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ ज्या वादळाच्या ढगांवर वीज चमकत आहे त्या वादळाप्रमाणें ज्याच्या वक्षस्थलावर यज्ञोपवीत झळकत आहे तो अुग्र विप्र—तो धर्म !—प्रेमळ रुसण्यांत आह्मी त्या शेवटच्या रात्रीं दूर आहोंत तोंच रात्र सरून पहाटेसच अकस्मात् आमची नित्याची ताटातूट करणारें कठोर कर्तव्य दत्त ह्मणून येअून अुभें राहिलें !

२ कर्तव्यबुद्धि अुपजताच धर्माची दास झाली. पण हृदय प्रीतीचें दास झालें. जोंवर प्रीति आणि धर्मकर्तव्य अेकरूपच होतीं तोंवर दोघांचीहि सेवा सुसंगत होत असे. पण त्या रात्रीं कर्तव्याची आणि प्रीतीची ओढ अेकमेकांच्या अगदीं अुलट जाअूं लागली आणि त्या दुहेरी दास्यांत निवड करण्याची कठीण पाळी आली !

॥ १६ ॥

कडकडे अहा दार तों ! तपोमूर्ती
घुसतची प्रभातासह [1]ती
तो दर्भ अनुल्लंघ्य आपणांमाजी
फेंकीत ' दूर ' वदली जी !

मी ह्मणतांची ' मान्य ! ' सोडि तो आज्ञाः
' करुं सांग तरी रणयज्ञा
भेटुनी घेतलिस न पुरी
ती भेट ही सदा अपुरी
राहील अशा बहु दूरी
ज्या अंधेऱ्या । पाताळदऱ्या
जा देत पहाऱ्यासि तेथ ने जन्मा
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

१ त्या विप्राची ( त्या कर्तव्याची ) ती मूर्ति !

२ ' त्या रात्रीच्या त्या प्रेमळ रुसण्यांत थोडा काल जातों तोंच पहाट झाली नि तीसरशी अकस्मात् शत्रूचा छापा पडून सखीच्या संगतीस नित्याचे मुकविणारे, ह्या शत्रूच्या हाती काळ कोठडींत आजन्म बंदींत पाडणारें, हे दुर्धर कर्तव्य दत्त हाणून अुभें राहिलें ! ' हा भावार्थ.

॥ १७ ॥

हा हाय अतां भेट अह्मांसी कुठली !
आशाहि अजी मज विटली ।
हा हाय अह्मां बुद्धि अुपजली कैशीः
या स्वयें पडाया फांसीं !
ना निंदीना, विप्र[1] ! आपुली सेवा
मद्दास्य साक्षः तूं देवा !
परि काय करूं या हृदयीं
तळमळत जीव हा बाहीं
' हृद्दयिते ! दयिते ! येअीं ! '
तरि शतपूजा, अर्पियल्या ज्या, त्यामधिं माझ्या;
मानालें[2] महापूजनची या झुरण्या !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ विप्र०:—मागील कडव्यांत अुल्लेखिलेलें कर्तव्य; धर्म;

२ ' मी केलेल्या सर्व त्यागांत हा प्रियजनांचा त्याग, कर्तव्यास्तव भोगलेल्या सर्व यातनांत ही विरहाची यातना हीच ध्येयाचे, धर्माचे, चरणीं वाहियलेली महापूजा होय ! यास्तव हें झुरणें दूषणास्पद नसून असेल तर कर्तव्यतत्परतेची खरी कसोटी आहे. कारण विरहानें अितका व्याकुल झालों असतांही कर्तव्यांत मी कसर होअूं देत नाहीं ! ' हा भावार्थ.

॥ १८ ॥

तरवारीची धार उग्र, वय कवळें,
शिवलें न यौवना शिवलें,
ये अधांतरी भंवळ, कंठही सुकला
तोलीत प्रतिपदीं तोला,
करिं पेला हा आसवांत[1] भरभरला,
बिंदू न पाहिजे गळला !
रे कोल्हाटी क्रूर खेळ तव ! धारे--
वरि नाच नाचतां या रे
हें रक्त गळे: गळुं दिधला
ना थेंब हलुनि तो प्याला !
अणि ह्मणती "धिक्[2]" जन वदला:
'करिं हो धरिला, रिताची प्याला !"
तें खरेचसें तुजसि तरी भासो ना !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ आसवांत: मद्यांनीं आणि दुसऱ्या अर्थी अश्रूंनीं

२ वीर धर्माची अटच त्या परिस्थितींत अशी होती कीं हसत तें उग्र व्रत कर ! ह्मणून रक्त गळलें तरी प्रकटपणें अश्रु गळूं दिला नाहीं. परंतु त्याचा विपर्यास होऊन सहानुभूतिशून्य लोक ह्मणाले: याच्या हृदयांत अश्रूच नाहींत. मानवी कोमल भावनांचा लवलेश हृदयीं नसलेला हा कुणी राक्षसी मनुष्य आहे ! पण तुझ्या प्रीतीचा बळी देणारी ही माझी वरवरची कठोरता पाहून तो आक्षेप, सखे, तुला तरी खरा भासणार नाहीं ना?

॥ १९. ॥

अणि तुझ्या तरी हस्तिं असा कां देवा
हा विषम विपर्यय व्हावा !
ये पितांहि जो पाजिता न वा प्याला:
कां आसवांत तो भरिला !
सुम कोमल कां हृदय दिलें वा कां या
योजिलें वज्र वाराया !
सखि ! कवण वदे ' दयित जनांची माया
याच्या न शिवतची हृदया !'
जी स्वयें अुपाशी हरिणी
निर्दुग्ध तिच्याची थानीं
हुंदडे देअु देअूनी
शावकें जशीं, बिलगतीं तिशी, या हृदयाशी,
त्वत्स्मृती तशा तोडतोडती पाना !
छळि विरहवेदना प्राणा !

॥ २० ॥

तरि सखये ना समज सहे असहासी
कीं ह्मणुनि मी नची सोशी
वा वदतो हें असह दुःख मी सोशी !
ह्मणुनि तूं नकोशी होशी !
नाः प्रीति तुझा गोड विरहही भारी !
तो तुझा ह्मणुनि आभारी !
जों ओतित हा असह शोक तव कवनीं
हृत्पात्र पात्र भरभरुनी
[1]स्मृति–दूर मलियिंच्या–लहरी ( तों )
सळसळत मनः कासारीं
वृत्तींच्या खेळत कमळीं
तनुच्या तारा, अति मधुमधुराः
त्या छेडुनिया देति साद तव कवना !
छळि विरहवेदना प्राणा !

---

१ स्मृति हाच दूरवर असणारा मलयगिरी; त्याच्यावरील झुळका अर्थात प्रियजनांच्या प्रेमळ आठवणी.

॥ २१ ॥

बहु आशा ही अहह लाडके होती
प्रथम जैं उषा[1] उगवे ती :
सुमकाननिं कीं सिंधुसंगमीं सरिता
पाहूनि कुण्या एकान्ता,
हा छोटासा एक बंगला; स्वास्थ्या
ज्या वस्तु अवश्यची त्या, त्या;
ती गीता; तें आदिकाव्य; ती वीणा
फुलबाग काम्यकष्टांना
स्वरसुखा चित्रिण्या जितुकी
पटभूमि समुचिता तितुकी
तितुकीच अणी अर्जुनि कीं
संगतीं तुझ्या । सुखशांतिद या,
दिनें[2] न्यावा हा कळुंहि देत ना कवणा !
छळि विरह वेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ नवयौवन.

२ हा जीवनकाल.

॥ २२ ॥

परि भंगी ती देव लाडके आशा :
दिन असा ये अुषे तैशा !

तें ठीकचि कीं देव शक्ति निज कवणा
दावील जरी ना दीना !

मम लहानशी नाव : थोर तव[1] सिंधु:
बुडतांहि धजेना निंदू !

ज्यास्तवची ये भिक्षु तुझ्या दाराशीं
त्याविना सर्व त्या देशी !

शोकाच्या गेहीं होती
जे दास करूं त्याची ती
प्रियविरहमरूची शेती
त्यानाही ना, भोगूं सधना, ज्या दासधना[2];
—ती अश्रूंची चैनः तीहि मजसी ना !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ तवः—देवा, तुझा.

२ दासधनः—'रोमन गुलामांस जें Peculium ह्मणून दासधन ठेवण्याची अनुज्ञा असे, तेवढें तरी चैनीसाठीं ठेवतां येअी. तसें शोकाचे, दुःखाचें, जे दास त्यांना रडून दुःख हलके करण्याची संधि असते. पण ज्या परिस्थितींत या शोकाच्या कैचींत मी गवसलों आहे तींत ती 'अश्रूंची चैन' देखील भोगणें निषिद्ध झालें आहे. रडण्याची देखील चोरी झाली आहे, हा भावार्थ.

॥ २३ ॥

काथि दिलें न तें तेंचि ह्मणुनिया, देवा,
अकृतज्ञ या न लेखावा !
जें दिलेंसि तें, हाय बिंदुची, तरिही
सिंधूंत मावणे नाहीं !
निश्चक्षु[1] अगे रात्रि ! पहाट न जीतें
सांगतो तव समक्षचि तें:
कीं प्रकाश तो[2] प्रथम, अनंतर नयनें
दे, सुख न तरि, सुखस्वप्नें !
मी दुःखांच्या पीत विषाचा प्याला
पुसतसे दुःखवाद्याला:
सुख अधिक नसे जगाति पिसें तरि कैसें
हे जगत् जगाया, ऐसें !
ना प्रभो ! मूर्ति मोहक ती,
प्रिय चित्तचंद्रिका ती ती,
पळ परी भोगु दिधली ती ( जी )
त्या सकळांची, पावती अजी, घे तुला तुझी,
अेकची मना खंतःदेअुनी कां त्या !
छळि विरहवेदना प्राणा ! !

---

१ निश्चक्षुः—ज्यांत पुढचें ( भविष्य ) कांहींअेक दिसत नाहीं असा निबिड अंधकाराचा हा संकटकालः ही काळ कोठडींतील बंदी.

२ देव.

॥ २४ ॥

" धरि, ' काय वदां ? 'धीर धरि ! अुषःकाला[1]
ना प्रहरही तुझ्या झाला !
दिन सकल अुरे अजुनि काय होणारें
तें ज्ञात तुला कां सारें ?
भूकंपांचे पर्व हें: क्वचित् याही
पळिं पेटवित दिशा दाही
अुठतील जाळ जे करिते
नवखंड महासिंधूंते
नव महासिंधु खंडांते
शकलचि[2] सकलां, सकलहि शकलां, कां न त्या पला,
हो दृश्य[3] अुद्यां ध्येय आजचे नयनां ! '
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

१ अुषःकालाः—तुझ्या जीवनाच्या पहाटेला. आतांच कुठें यौवन अुगवत आहे. अजून आयुष्याचा सगळा दिवस पुढेंच आहे.

२ शकलः—खंडित भाग; तुकडे तुकडे.

३ अेखादा भूकंपः—राष्ट्रीय अुलाढाल-होअून आज जें तुझें नुसते "ध्येय" आहे ती हिंदुपदपादशाही अुद्यांचें 'दृश्य' ही कशावरून होणार नाहीं !

॥ २५ ॥

'तें ध्येय अणी ! देव ज्यासि लोभावें !
मृत कल्पतरु बहारावें !
अुज्जयनींचे[1] कळस कांचनी देखे
डुलविती नव जरीपटके !
चिरमूक, अहो देवदुंदुभी, वाजा:
गा भाट: परीनों साजा:
सिंहासनिं, गा !, चढत फिरोनी आजी
आदित्य विक्रमाचा[2] जी !
नव जीवनिंच्या शुभ कोपें
तोडीत पल्वली[3] कुलुपें
भरभरुनि पुन्हां पुण्यापें
राष्ट्र—जान्हवी ! सनातन नवी !
फोंफावत, गा !, जाय धुवूं हरिचरणां ! !'
छळि विरहवेदना प्राणा !

---

१ अुज्जयनी:—अुज्जयनी नगर ( श्लेषार्थानें विजयवती ) ती भारताची भावी राजधानी होअील. तीवर नवे जरिपटके डोलूं लागतील !

२ विक्रमाचा आदित्य:—राष्ट्रीय पराक्रमाचा सूर्य ( श्लेपार्थानें कुणी नवा विक्रमादित्य )

३ हिंदुराष्ट्राचा जो हा महान जीवनौघ आज जातिपाति भेदांच्या कुंडांनीं, डबक्यांनीं, खंडविखंड झालेला आहे तो क्रांतीच्या महाकंपासरशी अेकजीव होअून अखंड आणि अप्रातिहत वेगानें फोंफावत आपलें जीवन मनुष्यमात्राचे कल्याणार्थ प्रभूच्या चरणसेवेला वाहील.

॥ २६ ॥

'भवसागरिं, गा !, देव जो अुभारीती
भवदीपस्तंभ हिमाद्री !
त्यावरति पुन्हां धर्मदीप अुज्वलता
आध्रुवध्रुवा पथदाता
संरक्षिति ज्या लक्ष लक्ष कल्याणा
नव जल–स्थल–वियत्सेना
संपन्न असा विप्रयज्ञ[1] हा होतां
मग बघुनि कुण्या अेकान्ता
तूं आवडत्या त्याचि तिच्या प्रियकंठीं
मारूनि मिठी—" "आजि नचि तीः
नचि गोष्ट पुन्हां, हाय, नका हो काढूं:
मज मोहपंजरीं पाडूं !
आतांचि कुठें काळोखीं
लागलें दिसुं[2] असे मज कीं
आशेची क्षणिक लकाकी
अधिकचि जीवीं । कासाविसवी
अधारीं अंधारि मात्र दे नयना !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

१ विप्रयज्ञः—मागें अुल्लेखिलेल्या ज्या विप्राच्या–धर्माच्या–कार्यास तूं वाहून घेतलेंस तें धर्मकार्य, तो महायज्ञ, असा यथासांग सफळ होतांच.

२ या दुःखाचा हा काळोखही ज्या माझ्या नयनांच्या अंगवळणीं पडत आहेः ( मला आतांच कुठें सहनीय होअूं लागला आहे ) ते नुसत्या काल्पनिक आशेच्या क्षणिक चमकेने दिपून जातात नि त्यांस अधिकच अंधारी येते !

॥ २७ ॥

अजि नेलि कुठें मूर्तिभंजकें माझी
ती मूर्ति जिवाभावाची !
देऊळ सुनें हाय फुलांची माझ्या
अजि अर्पुं कुणाला पूजा !
धरि धीर वदा ? परि न काय ही तापें
सुकतील सुकोमल पुष्पें !
जाअील शिळें जलहि अुषेचें वाया
नेत्राभिषेकपात्रीं या !
निर्देव देवळामाजी
माझिया हृदाच्या आजी
ही झुरे बालविधवाशीं
तारुण्यलता ! निजकुसमां त्या !
अपुल्याचिवरी बघुनि झरत जातांना !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ 'धीर धर—आयुष्यांत पुढें कधींतरी तुझी सुटका होअून तुझ्या दयितेची भेट होअीलहि !' अशा समाधानास अुद्देशून.

२ 'परंतु ह्या नवयौवनाच्या लावण्याचें हें पाणी, ह्या रसरसलेल्या भावभावना, आज शिळ्या होत आहेत, विरहाचे तापानें ह्या तरुण तनुलतेची हीं फुले सुकत आहेत—तीं सुकून जाण्याचे आधीं भेटीची हौस होती ! ती पुरणें तर शक्य नाहींच ना ! जीवन लावण्यरहित, रूक्ष, निर्माल्यवत् , झाल्यावरच ना माझ्या प्रीतिदेवतेची भेट झाली तर होणार ?' हा भावार्थ.

॥ २८ ॥

"ही आसक्ती"[1] योगिवरांनो प्रीती
परि कुठें जी न आसक्ती!
तरि झुरला कां दास तो समर्थाचा[2]
हरवता शिष्य लोभाचा?
तळमळला श्रीकृष्ण आणि लोभाचा
जाअि पडे रणी तो भाचा[3]?
हरवशी कुठें हाय हाय गोपाला:
करि मुक्त शोक कां मीरा[4]?
कां तुका[5] साश्रु त्या वाटे
-अैकण्या प्रिय निरोपाते?
हा सीते! अजि हा सीते!—
क्रंदत कवळी । रघुवीर[6] वेली!
या अश्रुघना वीण अिंद्रधनु[7] तें ना!
छळि विरहवेदना प्राणा! ॥ धृ० ॥

---

१ हे विरहाश्रु तुझ्या आसक्तीचें फळ आहे! आसक्ति सोडून प्रीति कर ह्मणजे विरहाचें दुःख होणार नाहीं! असा योगिवरांचा अुपदेश मनाचे समाधान करूं पहातांच मन अुत्तरे 'प्रीति तर राहोच पण प्रीतीचें अनासक्त रूप ह्मणून ज्यास तुह्मी भक्ति ह्मणतां तीदेखील आसक्तिविना कुठें होती? तीदेखील विरहासरशी अशीच अश्रुव्याकुळ होते! २ श्रीसमर्थ त्यांचे शिष्य शिवराजे गेले तेव्हां दुःखी झाले. अन्नत्याग: देहत्याग केला! ३ अभिमन्यु. ४ संत मीराबाअी, तिची गोपालाच्या विरहानें व्याकुळ असलेली 'बता दे सखि कोन गली गये शाम!' प्रभृति पदें प्रसिद्धच आहेत. ५ तुकाराम: पंढरीस जाअूं शकले नाहींत ह्मणजे वाटेवर वारकरी परतून येअीत तों बसत नि विठ्ठलांनें माझी कांहीं विचारपूस केली का? ह्मणून अश्रु गद्गद होअून विचारीत। ६ सीताविरहव्याकुल अवस्थेंत सीता समजून वेली लतांनाच आलिंगिणारा रामचंद्र. ७ प्रीतीचें अिंद्रधनुष्य अश्रूंच्या मेघांतच काय तें संभवते! आसक्तीच्या आंसवांतच प्रीतीचें प्रतिबिंब रंगून अुठू शकतें.

॥ २९ ॥

अणि प्रीति तिथें विरह असेची ! " कीं ती—
हृदयांत दों तुझी प्रीती !
परि हृदयीं तूं तवचि आत्मरत होशी
तरि छळी विरह कां तुजशी ?[1]"
तरि सांगा जा फुलुनि आपुल्याची या
परिमळा गुलाबा घ्याया ! :
वा स्रवूं रवा मंजु अहो मुरलीला
जों मधुर अधर ना शिवला !
खाऊसि खव्याला खाऊं !
वाटेसि वाट निज पाहूं !
गंगेंत तिळाची न्हावूं !
चंद्रिकेसि त्या, आल्हादकता
तव चक्षूची देत चकोरा तृष्णा[2] !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ " द्वैत रतींत विरह संभवतो. पण अद्वैत आत्मरतींत तो संभवत नाहीं. यास्तव तूं आत्मरत हो. ह्मणजे विरहव्यथा संपेल, " असें समाधान कराल. पण आत्मरतींत विरह व्यथा नसेल तर प्रीतीचें सुख पण नाहीं ! कारण प्रीति ही भावनाच द्वैती आहे. प्रीतीला दुसरें कोणतें री प्रीतिमाजन हवेंच. अद्वैतांत प्रीति हा शब्दच संभवत नाहीं.

२ चंद्रिकेंत स्वयमेव आल्हादकत्व नाहीं. तिचा आल्हाद तिलाच भोगतां येत नाहीं—चकोराचे नेत्र तृषित आहेत ह्मणूनच चंद्रिका आल्हाददायी होते.

॥ ३० ॥

विरहाश्रूंची हीच नदी सीमा जी
जारिणी–विरहिणी माजी !
प्रेय वदनाच्या स्मरत जयांनीं भासा
चुंबिलें नसे आकाशा
त्यांच्या न कधीं अधर लागुनी अधरीं
वीजची हृदीं संचरली !
प्रिय विरह दिवस–देवांहीं
पर्यायपीत गे मम ही
पांडुरा मूर्तिची पाही––
त्वत्प्रीतीच्या । संभोगाच्या
गत पुनवेची साक्षः तनुकला[1] करुणा !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ चंद्राच्या कला देव पाळीपाळीनें पितात ह्मणून तो क्षीण होत होत शुक्ल प्रतिपदेस कृशतम असतो असा अेक कविसंकेत आहे. तशी तुझ्या पूर्वीच्या समागम सुखाच्या पौर्णिमेस ही माझी सकल कलांनी विकसलेली तनु, विरहानें क्षीण होत होत आज त्या प्रीती पुनवेच्या अुत्कटतेच्या साक्षीपुरती कायती कलामात्र अुरली आहे !

॥ ३१ ॥

ना लागेना गोड आतां मज कांहीं :
मज कुठेंहि करमत नाहीं !
अणि गोड अकस्मात लागतां कांहीं
मरणसें[1] मनाला होई !
मज सुखही दे दुखः ! कशासी आतां
सुख हवें हाय तूं नसतां !
लावुनी सुखाचा वशिला
आलीस जया गेहाला
त्या गेहिं तयाचि सुखाला
मिटति अुघडती ! दारें अजि तीं
तव वशिल्यानें[2] ! चतुर अशाची ललना !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ० ॥

---

१ कांहीं गोड लागतांच तुझ्यावाचून मनाला गोड लागावें ही तुझ्याशीं प्रतारणाच होत आहे असें वाटून लज्जेनें मनाला मेल्यासारखें होतें !

२ तुझी प्रीति अत्यंत सुखद ह्मणून तूं प्रथम हवीशी झालीस, पण सुखाच्या अशा वशिल्यानें तूं ज्या माझ्या घराची ( जीवनाची ) स्वामिणी झालीस त्याच घरांत आतां तुझ्या वशिल्यावाचून सुखाला येण्यास मज्जाव होत आहे ! तूं असलीस तर सुख हवें तूं नसलीस तर सुखही नकोसें होते !

॥ ३२ ॥

विरहाग्नीनें पुष्ट अश्रु हे, आणी
विरहाग्नि पुष्ट अश्रूंनीं :
नांदोत असें करित परस्पर पूर्ती
हा विरह, आंसवे अणि तीं !
मज सुखहीं दे दुःखः दुःखची तैसें
मज सुखदः तपस्याग्नीसें !
हो जपी तपी फळद तुह्मांहो तुमची
मज आणि तपस्या माझी !
ती शिला नको वा मूर्ति
भावने नसूनी दिसती !
आलिंग्य, चुंब्य, असती, ती
प्रत्यक्ष अशी, तव मूर्ति मशी,—समचेतनशी,
तींतची दिसो देव माझिया भुवना !
छळि विरहवेदना प्राणा ! ॥ धृ. ॥

———

१ शिळेच्या वा धातूच्या मूर्तींची आराधना करीत त्या त्या प्रतिकांशीं मीरा, तुकाराम, चतन्य यांच्या- प्रमाणें मानवी नातीं जोडल्यानें जर ती प्रीति अंतीं भक्तिपद पावून देवाच्य साक्षात्काराचें साधन होतें तर शिळेहून सचेतन, आणि माझ्या प्रेमभावनांशीं समवेदन होऊन प्रत्यक्ष संभाषण—संनिवास—समालिंगन करणाऱ्या ह्या तुझ्या सजीव मूर्तीलाच मी देवाचें प्रतीक समजून तिच्यावर अुत्कट प्रेम करूं लागलों तर ती साधनाही अंतीं देवाच्या साक्षात्काराचें त्या जडमूर्तिहूनही सुलभतर असें साधन कां होअूं नये; हा भावार्थ. भक्तिमार्गांत कोण्या मानवी प्रियजनासच मूर्तीसारखें प्रतीक कल्पून त्यावरच निस्सीम प्रीति करण्याचा अेक साधनासंप्रदाय आहे. भैरवी, रामकृष्ण प्रभृतींच्या अशा साधना प्रसिद्धच आहेत.

# सावरकार–वाङ्मय !



**Hindu Padpadshahi** (इंग्रजी) मूल्य ३ रु. } 'केसरी' म्हणते,
**हिंदुपद पादशाही** ( मराठी ) मूल्य २ रु

न्यायमूर्ति रानड्यांनीं अर्धेच सोडलेले कार्य बॅ. सावरकरांनीं ह्या पुस्तकांत शेवटास नेले.' महाराष्ट्र साम्राज्याचें मर्म विशद करणारें असें दुसरें पुस्तक आज उपलब्ध नाही ! *Lala Lajpatrai says* "It is full of facts conjested in a small space & made to speak with tongues of fire and love. In my opinion every Indian Politician ought to study it" The Mysore Chronicle writes—"There is not one page dry any where and after finishing the book one wishes there were more pages to follow. Eloquent passages abound in the book."

**HINDUTVA** (इंग्रजी):–मूल्य १ रु } आर्यसमाज, हिंदुसभा
**हिंदुत्व** ( मराठी ):–मूल्य १ रु

प्रभृति अनेक संस्थांनीं आणि विद्वानांनीं संमत केलेली हिंदुत्वाची व्याख्या ज्यांत दिलेली आहे तो उत्कृष्ट निबंध. परलोकवासी स्वामी श्रद्धानंद म्हणतात "अहो, कोणत्या शुभ मुहूर्ती लेखकाला हें सत्य स्फुरलें ! ती वेळ बहुधा उषःकालाचीच असली पाहिजे." भाई परमानंद M. L. C. म्हणतात 'हिंदु कोण, ह्या अत्यंत वादग्रस्त प्रश्नाचें निर्विवाद आणि निश्चयात्मक उत्तर दे. भ. बॅ. सावरकरांची ही व्याख्याच होय !'

विकाऊ पुस्तकें मिळण्याचा पत्ता } डॉ० सावरकर, गिरगांव मुंबई किंवा बॅ सावरकर, रत्नागिरी.

## गानफुलें-पगडी ३ री.

# मूर्ति दुजी ती!

(सन १९१०)

[परिचयः—सन १९१० मध्यें बॅ. सावरकर फ्रान्समधून परत येतांच इंग्लंडमध्यें धरले गेले. लंडनच्या पोलिस चौकींत प्रथम बंद असतां इंग्लंडच्या मानानेंहि अतिशय कडक अशी थंडी पडूं लागली. त्यांतहि त्या कोठडीच्या भिंतीहि दगडी! फरशी दगडी! त्या गारांसारख्या गार व्हाव्यात! जवळ अंथरूण तर काय, पण पुरेसें पांघरूणहि नाहीं. दिवस-रात्र पाय आपटावे, हात चोळावे, त्या पंधरा वीस पावलांच्या लांबीतच भरभर फेऱ्या घालाव्या, तेव्हां कुठें गारठून जाणारें रक्त कांहीं ऊष्णता पावूं शकावें. त्या भयंकर शारीरिक गारठ्याचा परिणाम मानसिक उत्साहहि गारठण्यावर होऊं पहात आहे! त्यांतहि त्यांच्यावरचे आरोप राज्यक्रांतीचे! फाशीच्या छायेंत आपण आज उभे आहोत हें त्यांस कळून चुकलेलें! त्या छायेत प्रत्यक्षपणें असे—त्यांचें हें पहिलेंच—पाऊल पडताना त्या उग्र भीषण कर्तव्यास तोंड देण्याचा जो असा प्रसंग त्यांच्यावर आला, तो निभावून नेण्यास धैर्यस्फूर्तीहि तितकीच

अुग्रभीषण हवी होती ! त्या रात्री तशी स्फूर्ति देणाऱ्या ज्या भावना त्यांचे हृदयात संचरत्या झाल्या, त्याच त्यानी ह्या कवितेंत ग्रंथिल्या आहेत.

कर्तव्य केव्हा मोहक असते, केव्हां मारक ! त्यास साथ देणाऱ्या कवितेच्याहि तशाच दोन मूर्ति असतात--अेक लोलुप, शीतल, विलासी: दुसरी भव्य, भीषण, रुद्र ! कवि म्हटला म्हणजे तो नेहमीच कुणी अेक भाबडा, दुबळा व्याकुळ प्राणी असतो असे नसून खऱ्या कवीची सारंगीच प्रसंगी कर्मवीराचे रणशृंग होअून अुठते. कवि कर्मवीरहि असू शकतो ! कवितेची अेक मूर्ति--त्या रासलीलेतील मनमोहनाच्या ओंठावरील मुरलीतून ओतली गेलेली: त्याच ओंठानी ती मुरली दूर सारून जेव्हां "कालोस्मि लोक क्षयकृत् प्रवृध्दो" म्हणून रणशृंग फुंकले तेव्हां "दंष्ट्राकरालानि भयानकानि" पदविन्यास करीत जी अर्जुनासमोर थैमान घालू लागली--ती कवितेची दुसरी मूर्ति ! तिचेच ध्यान या कवितेत केलेलें आहे. ]



# " मूर्ति दुजी ती "

( सन १९१०. )

( वैनायक[1] वृत्त. )

अपरिचित न जो तुझिया मधुर विलासा :
रम्य सरें तीं, नलिनें, नाल सुभग ते,
ते सुगंध, भृंगगुंज, त्या सुमंजुला
सारंग्या, गीतें तीं गोड, गोड ती
दयित स्मृति—आलिंगन जीस तृप्तवी,
शेती ती हिरवी, आल्हादिते मळे,
सरिता—पुलिनोत्थ थंड तीं कलिंगडें,
मुक्त नील आकाश श्री मनोहरा,
मुक्त नील सागरतल, मुक्त वायु ते,
राजमार्गिं भक्तीच्या गजर गोड वा
टाळ मृदंगांचा हरिनाममत्त तो,
चंद्रबिंब शारद मेघांत धांवतें—
आशा कीं रिक्त संशयांत सुखभरें:—
ऐसें जें नव, संगत, मंजु, मुक्त जें
त्या त्यांतिल मधुर विलासासि जो तुझ्या

---

१ ह्या वृत्ताविषयींची माहिती प्रस्तावनेंत पहावी.

मूर्तीच्या लावण्य श्रीस वर्णिता
भाटचि तो लंपट तवः देवि ! तोहि मी
आजि अहह अिच्छितसें रूप देखण्या
तें दुजेंचि तव ! तव ती मूर्ति दुजीची !!'
मूर्ति मधुर नाः परंतु ती भयंकरा
तव दुसरी घोर मूर्ति ! दावि ती मला !
कारण तूं बघसि कां न आजि मज अिथें
अैशा ह्या लोह पिंजऱ्यांत कोंडिला
हिंस्र कुणी पशु जैसा वध्य तसाची;
आणि अैकशी न काय लोक पहातें
परस्परासि जे कथिती दावुनी मला :
" असता हा हिंस्र कुणी पशुचि कीं क्वचित्
टिकता या पिंजऱ्यांत—वीर वा कुणी !
हा तो परि केवळ कवि, भाव कोंवळा;
शोभेची मात्र वस्तु ! शयन रंगणीं
विजयायुध वीणाची, म्हणुनि कां कधीं
विजयायुध ती होअी समररंगणीं ?
कसली ती कविता सुखभोग लोलुपा !—
दाविल ना ह्यास अिथें तोंडहि पुन्हां !
नसता कवि रहता तरि; हा तगेल ना !! "
कां ? कविता काय कुणी पण्य अंगना[1]
कीं जोंवरि अुत्सवीय मनविमोहका

१ वेश्या.

सुवर्णरत्न मौक्तिकांत तनु अलंकृता
तोंवरीच मात्र हात हंसत धरूं ये ?
आणि सुदैवाच्या आकस्मिका अशा
दुष्काळीं, पुष्करिणी शुष्क सलिल कीं
तेंवि रिक्तरसगव्हर हृदय तिचें ही
होउनि ती होत हात हिसडुनी दुरी ?
ना, ना, ना ! कुसुमसुगंधीय लाघवीं
तारेवरि वीण्याच्या नाचती मुदें,
तींच तिचीं होउनियां वज्र कर्कशें
धारेवरि खड्गाच्या नाचती पदें !
ना ! कविता निजभक्ता त्यागिना कधीं !
भक्त तिला त्यागो, ती त्यागिना तया !

कारण कीं मूर्ति तिच्या असति दोन, ज्या
कर्तव्या अनुसरुनी रक्षिती तिच्या
पूजकासि वा प्रियासि समयिं विभिन्ना.
अेक मूर्ति ती:—नाचत हृदयमंचकी
रसिक मनाची वीणा घेउनी करीं
तंतुतंतुतुनि कुशल–स्पर्श–पुलकिता
प्रेमाची वीज थरारुनी देत जे,
भावनांसि मोहन घालूनि ती करी
लोण्याहुनि कोमलशा;—कोमला अशा
कीं जाव्या चांदण्यामधेंहि वितळुनी !
आणि दुजी ती:—मूर्ति प्रखर जी तुझी

कविते घेऊनि शिरे वाण सतींचें
अहह हास्य करित प्रज्वलित चितागनी ! !

प्रथम मूर्ति तव; यमुना पुलिन भिजुनि जै
चांदण्यांत शीतल त्या रात्रिं जाहलें,
त्या रात्रीं कमलनयन श्यामसुंदरा—
सहित रासलीलेमधिं गुप्त--गोडशा
हृदया हृदयासि नाचनाचवी मुदें;
आणी आनंदाच्या किंकिणीप्रती
हास्य--लास्य--मग्न--गोपिका--हृदांतल्या
ताल धरित मंजुळ रुणु झुणुं झुणूं झुणूं !
परि यमुना--पुलिनीं रसभरित कीं अशा
त्या कवळ्या नंदकिशोराचिया मऊ
लुसलुशीत अधरांवरि मधुर होतसे
मुरली, जी, तीच अहा त्याच कोमला
अधरांवरि कर्कश रणशृंग होउनी
रणवेताळाच्या वेताळ--तांडवा
ताल पिटी भारतीय त्या रणामधें !—
“ अच्छेद्योऽयमदाह्योऽशोष्य अेवच,—
लोकक्षयकृत् प्रवृद्ध काळ, काळ मीं ! ”
दंष्ट्रा विक्राळ गर्ज भयद कोण तो
कविते, तव !—जो सहस्र वरसरांतुनी
घुमत येत आजहि, हे भुवन कंपवी ! !
—त्या छंदीं, त्या वृत्तीं, समरभीषणा—

प्रकटित तव चंडमूर्ति जी दुजी अहा
देवि ! आज देवों मज तीच दर्शना !
कारण कीं भिन्नचि हें अुदित आजला
कर्तव्य[1] क्रकचतीक्ष्ण ! आज ना असे
तन्मुद्रा स्मितशुभ्रा, वेष सौम्य ना
जरतारी थाटमाट रंगराग वा
रत्नखचित मुकुटहि तो आज ना दिसे.
वाद्यें ना मंगल, ना गीत--मंजु ते
ताफे रंगेल नव तमासगिराचे !!
आज दों--दिशा न पथांतूनि आवळी
भवनांच्या वर्षती फुलें; न हर्षती
ललनांचे लोलनयन; गर्जतोहि ना
लोकसंघ जयजय ध्वनी कृतज्ञ ते !
आजि सेवकांसि नसे पारितोषिकें

---

१ केव्हां केव्हां शक्य तितक्या सुखाचा अुपभोग घेणें हेंच कर्तव्य होअून बसतें. जसें अेखाद्या लग्नसमारंभांतः किंवा राष्ट्रीय दृष्टीनें अेखाद्या विजयोत्सवांत. छत्रपतींच्या रायगडाच्या राज्यारोहणाचे दिवशीं ज्या धन्य पिढीस त्यांत भाग घेता आला त्यास रागरंग विलास विहार अित्यादि सुखसाधनांची लयलूट करून त्या सिंहासनारोहणास साजरा करणें हेंच कर्तव्य झालें होतें. गणपत्युत्सव, मिरवणुकी, सभा, संमेलनें हींहि सुखद कर्तव्याचींच अुदाहरणें होत. परंतु ' त्या दिवशीं ' दुसरेंच एक कर्तव्य समोर ठाकलें होतें. ' आज अुलट सर्व ! ' हा भाव या च्छेदकात वर्णन केला आहे.

वांटित ये सोन्याचीं आमुचा धनी—
स्वयंसैनिका त्याच्या आज अवधि वा[1]
मिळते ना क्षणही कीं स्वेच्छ विलासा
' आशिथिल परिरंभीं परिमृदित मृणाली--
--दुर्बलशा ' अंगकांसि लगटुनी कुण्या
अविदितगतयाम यामिनीसि न्यावया !

आज अुलट सर्व ! अुग्र, ना-हिंडिस्ससा
लोखंडी जबडा वांसूनि आपला
कर्तव्य प्रकट आज ! मज चिरावया
दांतांच्या कवळ्यांच्या करवतींत दों ! !
दगडाहुनि निर्दय हें हृदय तयाचें:
वेषही न बर्बरता झांकि अशी ही
त्याच्या अंजि नंगी तरवार तनूची !
आणि बापरे ! थंडी ही भयंकरा !

---

१ अवधि – रजा, सैनिकास मिळते ती : " आमच्या धन्यानें–ह्मणज अीश्वरानें–नियतीनें–आज आह्मास कामगिरीची आज्ञा सोडिली आहे. विजयानंतर मिळणारी रजा–हक्काची सुट्टी–आमच्या वांट्यास आज किंवा क्वचित कधींहि येणारी नाहीं. ती कामगिरी संपल्यानंतरची गोष्ट ! तें सुखद कर्तव्य कामगिरींतून वांचतील ते भोगतील. सिंहगडाच्या सुतकानंतर रायगडचा समारंभ ! " हा भावार्थ.

२ भवभूतीच्या अुत्तर रामचरितांतील श्लोकांचा संदर्भ सूचित केला आहे. ' परिमृदित मृणाली दुर्बला न्यंगकानि । त्वमुरसि मम कृत्वा यत्र निद्रामवाप्ता । ' ' अशिथिल परिरंभव्यापृतैकैक दोष्णोः । अविदित गत यामा रात्रिरेव व्यरंसीत् । '

निर्दयतेहूनि थंड: थंड ! गोठलें
नदनदींत पाणी ह्या आणि शरीरीं
रक्त पिंड पिंड अहो जात थिजोनी !
या भयाण अकलकोर्डीत अेक ह्या
निःसहाय, निंदित, मीं बघतसें स्वयें
जीवनरस नाड्यांतुनि माझिया अहा
थंड पडत जातांना ! दगडचुन्यांच्या
या नंग्या अंधाऱ्या भिंतिच्याहुनी
गार गारठा अंगीं असह्‌ भरुनि ये.
कारेच्या कोठडींत नागव्या अशा
नंगें कर्तव्य असें मजसि गांठतें !
[2]आणि अधांतरिं शिखरावरति वायुच्या
संभाळुनि तोल सतत चढत धांवण्या
आज्ञा मज दे ! पाठीवरति लादुनी
पर्वतसम दुर्धर सद्‌गर्वभार हा
राष्ट्राचा अखिलाचि !! ये तरी अहा
तूंहि ! तुझ्या त्या दुसऱ्या चंडमूर्तीचें
दर्शन मज दे ! कविते, आजि दुजा तो
छेड सूर कर्कश, जो भिवावि भैरवा !

---

१ त्या वेळीं अिंग्लंडमधल्या कडाक्याच्या थंडीचं हें भौतिक वर्णन असूनहि तिच्या मानसिक प्रतिबिंबाचाहि ध्वनि त्या वर्णनांत अुमटत आहे.

२ वायूच्या अत्युच्च शिखरावर अधांतरीं चढून जाणें जितकें कठिण, तितकेंच केवळ कल्पनासृष्टींतच नित्रसणाऱ्या ध्येयास्तव, कोणचीहि यशाची निश्चिति नसतां, निराधार–' अधांतरीं '–केवळ आपण आपलें कर्तव्य आपल्या पुरतें तरी करावें म्हणून, शीर हातांत घेऊन निघणें हें दुर्घट असतें.

सूर ललित ना ! रुणुझुणु ताल तोल ना !
आवडते ज्याचे आघात कोंवळे
हृदयकुंजिं नाचविती गोड गुलगुल्या
मंजु गीतगोविंदांतील छंद ते:
अबलांच्या अबल हृदा अधिक अबल जे
करिती ते विलक्षणीय करुण छंद वा.
परि, कविते, भेरीचे सूर ते दुजे
छेड आजि, अबलाच्या अबल हृदांही
करिते जें प्रबल प्रलयोर्मि सिंधुसे !!—
मृत्युंजय मंत्र कुणी प्रकटवील जो
मूर्ति चंडिकेची अुद्दंड, द्यावया
चंड मनोबळदाता मजासि वर अजी !
कुरळीं जे खेळावें, केश मृदुल ते,
क्रोधानें राठ राठ अुठुनियां जवें,
फुटलेल्या पेंवांतुनि सर्प कीं तसे
बुचड्यातुनि चवताळत सुटुनि धांवती
स्कंधीं वा वक्षीं वा पृष्ठि वा मुखीं:
विकराल क्रोधभरें अति भयंकरा:
अेक्या निज हस्तेंची छाटुनी स्वयें
खड्गानें आपलेंच मुंड, फळ तसें,
अन्या निज हस्तीं घे: आणि अहो जी
रक्ताची धार अुडे वरि अुफाळुनी
लाल लाल चिकट विकट त्या गळ्यातुनी

धार तीक्ष्ण घट घट त्या क्रुद्ध मुखें पी
पेल्यांतुनि लाल मद्य पी जसें कुणी !!
पिउनि रक्त आपुलेंचि आपली तृषा
शांतवित्या त्या प्रचंड रौद्रभीषणा
रुंडधरा छिन्न मुंड मूर्तिसी नमो
नमो नमः सहस्रधा ! प्रमत्त नर्तने !
तूंची कर्तव्य मूर्ति ! तूं जरी अशी
सद्यः कर्तव्यमूर्ति मद्हृदापुढें
रुंडधरा, छिन्नमुंड, खंड कृपाणा
अशीची मूर्ति धरुनि, तूंहि ये करूं
कविते, या हृदयाचा पाठपुरावा !!
जें वेताळीय, काळभैरवीय जें
मारक जें, दुःसह जें, कठिण कटुकटू,
तेंचि आज आरोग्यद बलद हो तया !!
कीं जैसें तें होआ; अढळ जें चढे
वीरवर श्रीबंदा[2] वध शिलेवरी.

॥ २ ॥

॥ श्रीबंदावीर ॥

क्रूर लोह पंजरांत या निरुद्दशा
तीक्ष्ण सुळे !—लोहाचे दांत रक्तपी

---

१ शाक्तसंप्रदायांत चंडिकेचें हें " छिन्नमुंडा " नांवाचें एक तात्विक रूप प्रसिद्ध आहे.

२ श्रीबंदा—हा शीख लोकांचा प्रख्यात पुढारी व श्रीगुरुगोविंदाचा शिष्य होय. मुसलमानांस ह्यानें दे माय धरणी ठाय केलें. शेवटीं तो धरला गेला.

तेंवी शिवशिवत अहा देति
अल्प वळायातेंही तनुसि तयाच्या !
पीत रक्त लोह सुळे टोंच टोंचुनी
देहाची जाळी ज्या जाहली असा
निजरक्तीं न्हालेला कवण हाय हा
पंजरांत बंदिवान ? सिंह कीं जसा !
पंजरस्थ सिंहाच्या श्वान शिकारी
भंवति जसे भीत-धीट रक्तपिपासू
भुंकति बहु टपत तया भक्षुं फाडुनी :
शत्रूचे तेंवि मुक्तखड्ग हे थवे
भुंकत त्या पिंजरासि ढकलिती पुढें

दिल्लीचें दीर्घ पटांगण : सभोंवते
लोहगजांचें कुंपण रोखते जना:
ज्या भंवती शतसहस्र हिंदु अहिंदू
नरनारी दाट अुभ्या दूरवर--अहा
प्रेक्षाया हिंदूंच्या वीर रक्षका—
प्रेक्षाया हिंदूंच्या रक्षकासची

---

१ पंजाबमधून बंदावीरास धरून दिल्लीस आणिलें तेव्हां लोखंडी पिंजऱ्यांत बंद करून आणिलें. कारण मुसलमानास त्याच्या विलक्षण तडफेचा आणि यशाचा अितका धाक बसलेला होता कीं त्याच्यापाशीं अद्भुत सिद्धाअी (miraculous Power) आणि जादु असते आणि तो मनांत येतांच मांजरादिकांचें अिच्छामात्रें रूप धरून निसटून जातो असा मुसलमानांचा समज झालेला होता.

ना, परंतु हाय हाय तद्वधासही !—
प्रेक्षाया मात्र !! तोंच मुख्य कसायी,
बादशाह ज्या वदती, तोहि ये; हळू
फाटक—ना फट केवळ करकरूनियां
पंजर लव अुघडे : ओढून शृंखला
फरफर फरफटित हाय ठेंचठेंचुनी
बंदीवानासि टाकिला पटांगणीं.
खणखण अुपसूनि अुगारूनि भोंवती
शास्त्रास्त्रें शतशः सहसाचि रोखिलीं
अेक अेक शिष्य तया वीरगुरूचा
शृंखलांत बद्ध पुढें अेक अेक ये
" होशी का मुसलमान ? वांचसी तरी ! "
" हिंदू मी ! शीख आम्हि ! मरण मीं वरी !! "
" हें कुराण—हें कृपाण !--बोल पुनरपी "
पुनरपि ये पुनरपि ये ये पुनः पुन्हां
प्रत्युत्तर घोरनिश्चयोत्थ सत्वरीं
" हिंदू मी ! शीख आम्हि ! मरण मीं वरी !!
अेक अेक अुत्तर तुच्छवित कुराणा—
अुठतांची पडत धर्म वीर वरांचें
अेक अेक शीर्ष बळी क्रूर कृपाणा !
शंभरदां प्रश्न अुठत रानटी स्वरीं :
" होशी का मुसलमान ? वांचशी तरी ! "
शंभरदां अुत्तर दे कंप अंबरीं :

" हिंदू मी ! शीख आम्हि ! मरण मी वरी !!
अेक अेक धर्मवीर करित दोनशें
वर्जुनि भय गर्जुनि जय धर्मगुरूचा
वधशिळेसि वाहुनि निजशीर्ष देतसे !
बोथटलें तें कृपाणः जात बुडुनिया
सद्य[1] अुष्ण अुष्ण शोणितात वधशिलाः
अति अघोर अति अुदास दिवसही दिसे
झिंगतसा लाल लाल रक्त पिअूनी.

हाय, अहो ! परि त्या अति किळस आणित्या
स्थानीं बीभत्स–ह्याचि समयिं हें कसें,
कां, ये अति कोमल अति करुण लेंकरूं ?
आणि पडुनि त्या बंदी वीरवराच्या
सहसा तें मूल गळां, स्फुंदुनी वदेः
हाय पिताजी !! हां हा, काय दशाही
तनुची तव आज राजसाजभूषिता !!
राजराजभूषणाहि बंदिवान तो
वीरवर श्रीबंदा अहह आपुल्या
अेकुलत्या अेक्या तनयासि हुंगुनी
बोलेः हे बाळ ! तुझा मीं नसें पिता !
हिंदुधर्मची, बाळा ! पूज्य तव पिता,

---

१ सद्य–ताजें. बंदावीराचे आधीं त्याचे दोनशें शिष्य त्याचेपुढें मारले गेले आणि तरीहि तो गलित धैर्य होअीना म्हणून शेंवटीं त्याचा अेकुलता अेक राजपुत्र त्याचे समोर हालहाल करून मारला गेला–तें वर्णन या आणि पुढल्या च्छेदकांत आहे.

माता तव हिंदु जातिः जा तिच्यावरी
लिंबलोण ओवाळुनि कमळ कोमला
तनुचें तव तनया जा टाक सत्वरीं !!
सत्वरची साश्रू-सोल्हास तरींहि-
अुठत राजबिंडा तो वीरतनय तैं.
"होशी कां मुसलमान ? वांचशी तरी !"
"हिंदुधर्म मंगलार्थ मरण मीं वरीं !"
आणि हाय हाय त्याहि अर्भकाप्रती
नेताती ते नृशंस वध शिळेकडे:
हळु न्यारे, हळु ! संभाळूनि-- लेंकरूं
हें लहान अितुकें कीं साचल्या तया
रक्ताच्या डबक्यांतचि सहज बुडुनियां
जानें कीं जातां त्या वधशिळेकडे !!
बोथट[1] तरितें कृपाण कठिणतम तरी
अति सहजचि कर्म भयंकर करीत तें !
कठिणतमहि बलिदानीं सहजतम तसें
वीरसुत श्रीचंदा वीरवराचा
निज तनुच्या नवनालावरुनि खुडुनियां
वाहुनि दे हिंदु धर्म मंगलार्थ कीं
समर चंडिका चरण स्थंडिलावरी
निजसुंदर मुखमंडळ कमळकुसुमसें !

---

१ दोनशेंवर शिष्य हिंदुधर्म त्यागीनात ह्मणून मारतांना बोथट झालेलें तें मुसलमानी खड्ग.

हरहर ! सत् श्री अकाल ! जय ! पुनः पुन्हां
श्रीबंदा गर्वभरें गर्जना करी !
वीर करी गर्ज[1]; आणि शोक करि पिता:
—किति सुंदर ! शूर किती ! बाळ अेकची
अंतरलें तेंहि अभाग्यासिः घे अशी
श्रीबंदा हाय हाय हाय अंतरीं ! ! !

तों ते आलेच कोप—कंपभरानें
थरथरते शब्द, शिव्या, शाप वर्षतां !
आणी यच्छब्द अुभ्या पंचनदासी
सिंहाचा जेंवि गुहे, तेंवि गर्जवी;
यद्गर्जे अक्षरशः मुसलमान तो
ग्रामधाम सांडित घे वन सहस्रशः;
घोरीपासूनि[2] शल्य अति अघोर जें
दास्याचें हृदयिं सले पंचनदाच्या
तें अुपटुनि शतकांचा सूड सहा घे
यत्कृपाणः त्या बंद्या वीरवरातें
तेचि मुसलमान अजिश्चान कीं जसे

---

१ वीराचें कर्तव्य लागून बंदावीराला स्वपुत्राच्या हुतात्मतेनें अेकीकडे आनंदहि झाला. पण त्याचें पित्याचें अंतःकरण दुसरीकडे नैसर्गिक अपत्य-प्रेमानें आंतल्याआंत विव्हळहि होत होतें; स्वपुताचें रक्षण करण्यास असमर्थ झालेल्या स्वतःच्या दुःखद स्थितीनें हळहळत होतें.

२ घोरी—महमद घोरीपासून.

शृंखळिता सिंहावरि भुंकती बहू
तेंवि भुंक भुंकत पुसताति बहुपरी:
'हें कुराण—हें कृपाण ! बोल पुनरपी,
कुफरा, हो मुसलमानः वांचशी तरी !'

धर्मांधा ! यःकश्चित् सैनिकें दिलें
ज्याच्या ना कवडीचें मोल कुराणा,
सेनानी तो स्वयेंचि घालणार का
मूढा, तव भीक भीतिशीं अशा खुळ्या ?
"सच मुच क्या ऐसा है ?"—मुख्य कसाओी,
बोलति ज्या बादशाह, तो वदे मर्धे:—
"जावोची तरि सेनानीप्रती तया
सेनेहुनि अधिक सभादर समर्पिला !!
तो कुराण फेंकी ? तूं फेंक कृपाणा
आणी जा तीक्ष्णाग्रा सांडसाप्रती
लोहाच्या लाल तापवूनि आण जा:"
लाल लाल सांडस तीक्ष्णाग्र तीरसे
घेउनि ये हत्यारी: अढळ आसनीं
वीर बसे योगयुक्तः "बोल पुनरपी,
होशी ना मुसलमान ?" अेक अेक त्या
प्रश्नातें प्रश्नचिन्ह तेंवि पूर्तवी
तप्त लोह सांडस सहसाचि घुसोनी
वीराच्या तनुंत तीर तूणिरीं तसा !
प्रश्न'तीं अेक अेक तोडूनी अशा

मांसाचा लचका ओढूनि काढिती
लाल तापलेल्या खुपसूनि सांडसा !
अक्षरशः हा अघोर छळ रिपू करी !
अक्षरशः तें अघोर धैर्यं तो धरी
—तो बंदा अखिल हिंदु वंद्य हुतात्मा !!!
"छल अघोर हेंही तें धैर्य चळविना !
तरि अघोरतर भोगो खल छळांप्रती: "
बादशाहचि तो !—तन्निर्धित पडे कां
क्रौर्याची ती अणीव ? घोरतर छळा
कल्पी लव हत्यारी: तोंचि गर्जला
बादशाह; "ना तैसें मूढ ! हाणितां
आघाता शत न होय घाव शरीरीं
विषम तसा घाव होय हाणितां मनीं
आघाता अेकमात्र ! कुफर कारंटा[2]
मृतहि चिरा--तोडा तें हृदय ! " हृदयतें
त्या हुतात्म वीरतनय तनुसि चिरुनियां
तोडिति ते क्रव्याद क्रूरः—आणखी
अूष्ण रक्त थबथबुनी गळत ज्यांतुनी
जिवलगशा राजसशा लाडक्या अशा

---

१ हें बादशहा ह्मणाला.

२ कारटा—बंदावीराचा तो मारून टाकिलेला मुलगाः त्याचें हृदय काढून बंदावीराचे मुखांत कोंबण्यांत आलें ! कीं त्यानें त्या छळास कंटाळून मुसलमान व्हावें !

अकुळत्या तनयाचें हृदय तें अहो
जनकाच्या त्या वदनीं कोंबिती बळें ।।
हाय हाय—धन्य धन्य—हाय--हाय हा ।।
धन्य धन्य धन्य ! तरिहि धैर्य ना चळे ।।।

अुत्साहिना निघत मुखांतूनिः कीं असे
योगिवराचा आत्मा, क्रूर हो, तया
आधींची गत तेथेंः कीं ' विचाल्यते
गुरुणापिस दुःखेन न यत्र आगतः ! '

सैतानचि ! सैतानचि यांत घुसुनियां
वेडावी आह्मांसीः नर न, भूत हें ! :
किंकाळुनि भुंकुनि भुंकोनि नीच ते
नंतर आसन्न मृत्यु वीरवरा त्या
सभ्य मृत्युचें ही सुख मिळुं न द्यावया
अुंटावरि अुफराटें बांधिती बळें
आणी त्या लक्ष लक्ष जनततींतुनी
दिल्लीच्या गल्ली गल्लींत राक्षसी
मिरवणूक ती माते ! लोक पहाते ।।

लोक पहाते त्यां, त्यांच्याच रक्षणीं
प्राणदान करित्याचा घोर वध तसाः
हिंदूंच्या बीजाचे लक्ष लक्ष ते
जन, असुनी दोन हात, लांब मिशाही

---

१ ' यस्मिन्स्थितो ' न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ' ( गीता )

बहु मिशाळ षंढाहुनि षंढ होउनी
हिंदूच्या धर्मरक्षित्यासि पाहती
त्या दशेंत, त्या दुर्बीभत्सनेमधें !!
अेक जरी मायेचा पूत त्यांमधें—
आअीचें दूध जिनें अेक प्यायला
जरि असेल त्यांत तरी शपथ ! धिक् अरे
धिक् तुमच्या जीवितास ! लक्ष नर तुह्मीं:
लाटेनें केवळ कीं अुसळतां जरी
तरि सहसा टाकितांचि पार बुडवुनी--
पार ठार तुडवुनि ह्या दैत्य शतांशीं:
--वा निदान त्या निज भीरुत्व कलंका !

परि आतां तो कलंक हिंदुते वरी
निज मारक च्छाया ना पसरविल पुन्हां:
कीं त्यावरि रक्तासी अुष्ण अुष्ण त्या
हृदयाच्या आपुल्याचि ओतुनी अहा
शुद्धकरुनि हिंदुध्वज रंगवी पुन्हां
हिंदुवीर हा बंदा हिंदु हुतात्मा !
धर्मवीर हा बंदा हिंदु हुतात्मा ! !
देशवीर हा बंदा हिंदु हुतात्मा ! ! !

अुठति किळसवाणे दुर्गंध ज्यांतुनी
सडलेल्या कुजलेल्या मूत्रमलांचे
नगराच्या त्या अुकीरड्यावरी दुरी
नेअुनि मग खाटिक तें टाकिती तया

अमरमृता ! " जा कुफरा ! रक्तमांस ते
गृध्र तुझें खावोतीं श्वान सूकरें:
आणि जरी आत्मा कुफरांहि असेची
खावो तरि आत्म्यातें नरक जा तुझ्या ! "

तों होओी काय ! अहो रुजुनिया तिथें
तेंचि रक्त मांस तया अमर मृताचे,
त्यांतुनि हंगाम हुतात्म्याचिया तया
सूडाचा अुठला अुगवूनि अकस्मात्:
मानियले मूषक[1] ज्या, कःपदार्थ ज्यां—
तेंचि अहा सिंहासन पोखरूनियां
त्यां[2]—धरित्या सिंहांच्या क्रूर भीषणा
तोंडासचि करिताती आपलीं बिळें !
मृत झाला अुज्जीवित ! मृतचि मारिते[3] !
गाओीनीं मारियलें ठार कसाया !

---

१ बंदावीरास मारिल्यानंतर पंजाबांत काही काळ जरी हिंदूंची चळवळ दबली तरी त्याच हौतात्म्याचे आणि शौर्यांचे स्मृतीनें ती पुनरपि चेतली गेली. कारण ज्यांना मुसलमानांनीं ' मूषक ' म्हणून हिणविलें ते महाराष्ट्रीय वीर दिल्लीवर लवकरच चालून गेले आणि अटकपर्यंत पंजाब स्वतंत्र करिते झाले. त्याच संधीस साधून शीखहि पुनः बळावले आणि पंजाबांत अेक प्रबळ हिंदु राज्य स्थापिते झाले. ह्या अितिहासास अुद्देशून हा संदर्भ आहे.

२ त्या धरित्या–सिंहासनाला धरणाऱ्या, त्या राजपीठाच्या पायाचे स्थानीं केलेल्या सिंहाच्या आकृती.–( लक्षणेनें ) मुसलमानी साम्राज्याचें आधार असलेलें त्यांचे बळ.

३ जो पक्ष मृत तोच अुजीवित झाला आणि जे मारणारे होते ते मारिले गेले.

चिमण्यांनीं मारियले ठार ससाणे!
पायदळींची[1] रेती तापली अशी
कीं भाजुनि भस्म करी पायदळासी!!
आणी ना कुतरेंही भीक दे अशी
होय बादशाहाची बा दशा अहा—
—बंद्याचा सिंहनाद घेतसे जधीं
रूपांतर हिंदु डिंडिमामध्यें महान्!
आणि ओश दे अंतीं यश बळाधिका
मूर्तिभंजकांवरती मूर्तिपूजकां!

॥ ३ ॥

परि होअिल हें असेंचि हें न जाणतां;
होअिलही हें असें न, हेंहि जाणुनी;
अति भयाण अति महान अुच्च त्या स्थळीं
अंधःकारांत, घोर दक्षिणायनीं[2],
चिरवित निज देहा कीं वध्य पशु तसा,
घर्मास्तव नरकीं जो होअुनी पचे

१ पायदळ—मुसलमानी सेना. पायांखालीं तुडवलेली हिंदुशक्तीची माती-रेती—अशी तापली कीं तिनें तिला तुडविणाऱ्या शत्रूच्या पायदळास—बळास—जाळून भस्म करून टाकिलें.

२ दक्षिणायनीं—प्रतिकूल कालांत. मरणास दक्षिणायन प्रतिकूल असतें. कारण पूर्वी अुत्तरध्रुवाकडे असतांना तो रात्रीचा अंधःकारमयकाल असे.

तो वीर श्रीबंदा हिंदु हतात्मा
आज असो ध्येय मला अेकमात्रची ! !
तोची मज नरक[1] गमो आजि सरससा
स्वर्गाहुनि सप्ता ही ! विजय गीति ना,
—त्याची गा, स्फूर्ते, तूं असह अपजया !
ज्या सुरांत बंद्याच्या हृदय तंतुसी
लावुनि तूं घोरगीत गाअिलेस तें
व्यक्ति मरण सौख्याचें असह--त्याच ये
—त्या सुरांत कवितं ! तनुतंतु वाद्य हें
माझें ही बांधः राग तो निराश गाः
धैर्याचा परम तशा ! कां न कीं तशा ?
मी न काय अेक जरी क्षुद्र डहाळी
तरि त्याची प्रथिता अश्वत्थ तरूची
हिंदवीय वंशाच्या ? ती यदीयें[2] कीं
शाखा, जरि दिक्कुंजरहस्त दीर्घशी,—
हिंदु हुतात्म्या बंद्या वीरवराची ?

१ नरकासमान ज्या स्थानीं बंद्याचें प्रेत टाकिलें; नरकासमान असह्य अशा ज्या हिंदूंच्या अवनत परिस्थितींत बंद्यावीरानें धैर्य न सोडतां पुढीलांच्या यशासाठीं प्रस्तुतच्या अपयशास आपला बळी दिला; ज्या नरकांत त्याचा आत्मा पडेल ह्मणून मुसलमानांनीं शाप दिला:–हे सर्व अर्थ या ओळींतून सूचित केलेले आहेत.

२ यदीय–'ज्या हिंदु वंशवृक्षाची बंदावीर अेक शाखा आहे त्याचीच मीं अेक डहाळी आहें' हा भावार्थ.

तेंचि रक्त—अल्प सत्व—तरि शिरांत या
तेंचि बीज, जीवन तें, मृत्तिकाहि ती:—
तो शकला श्रीबंदा हिंदु हुतात्मा
सहण्यासी जरि असह्य छळ तसे तरी
कां शकेन मींहि न हे छळ सहूं अहा
मींहि हिंदुची असता ! हे सहेनची—
याहुनिही भयद असे छळ सहेनची
परि झटेन, जीवनांतिही झटेनची
करण्यासी ही विमुक्त मातृभू पुन्हां ।
मुक्त पुन्हां, शक्त पुन्हां, मनुजमंगला
पुण्यभूमि पुनरुत्थित पतितपावना !



## गानफुलें-पगडी ४ थी.

# सप्तर्षि.

(कारागृहांतील प्रथमान्हिकी:)
(पहिल्या दिवसाची डायरी)

सप्तर्षीनों असे तुम्हांसी विश्ववाद करितां ते
कोठेंही देह पडो तरि त्याचा खेद काय चित्तातें !
अंधारकोठडीच्या हरण्या हृदिंदच्या तशा तमाला ही
मज विश्वदीप्ति संतत तुमच्या देवांत सातमालाही
रुद्राक्षांच्या तैशा यदलकिं ह्या साज सात मालाही
त्या व्योमकोश देवा वाही कविता सदुत्तमाला ही

सप्तर्षि—( प्रथमावृत्ति सन १९२४ )

[ **परिचय**—स्वातंत्र्यवीर बॅ. सावरकर प्रथम इंग्लंड-मध्यें पकडले गेले त्यामुळें तो लंडनच्या 'ब्रिक्स्टन' जेल-मधला पहिला दिवसच त्यांचा बंदिगृहांतील खरा पहिला दिवस होय. पण ती नुसती अटक होती. अशा प्रसंगीं न्यायनिवाड्याच्या चौकशी, खटले, अपिलें प्रभृति कितीतरी अुलाढाली होत होत क्वचित् सुटकाही होण्याची–निश्चीत नसली, संभवही नसला, तरी अगदीं असंभवनीयताही नसते. त्यांतही पुढें मार्सेलिस प्रकरण अुद्भवून सारा देशविदेश 'सावरकरांना फ्रान्सला

परत द्यावें लागणारच ! सावरकर सुटणारच ! ' अशा ध्वनीनें निनादून अुठला. तेंव्हां नाहीं म्हटलें तरी सुटकेच्या आशेचा किरण त्यांच्याही मनांत डोकावून जाअीच. परंतु शेवटीं दोन जन्मठेपींची भयंकर शिक्षा वज्रलेप झाल्याची नक्की बातमी ज्या दिवशीं आली, स्वतंत्र नागरिकाचे कपडे जे तोंवेळ त्यांचे अंगावर राहू दिले होते तेसुद्धां हिसकावून घेअून पुनः जन्मांत न अुतरण्यासाठीं काळ्या पाण्याचे कपडे त्यांच्या अंगावर घातले गेले, तो शिक्षेचा पहिला दिवस मात्र त्या अटकेच्या पहिल्या दिवसापेक्षां, बंदिगृहांतील खरा खरा पहिला दिवस ठरला ! त्याकाळीं काळेपाण्याची जन्मठेप अैकतांच शेकडा पाअुणशे निर्ढावलेले बंदिवान् सुद्धां ' फाशी द्या पण तें काळेंपाणी नको ! ' म्हणून मटकन खालीं बसत ! काळेपाणी हा शब्द अितका भयंकर असे ! तीच गती आपली झाली: ह्यांत त्या दिवशी वेड्या आशेलादेखील लवलेश शंका अुरली नाहीं. सती जायला म्हणूनच चितेवर अढळ स्थान मांडिलें असतांही चिता प्रत्यक्ष भडकतांच सतीला जसा खरा चटका बसतो तशीच धृतीची स्थीत झाली. त्या विव्हलतेच्या विषाचा अुतारा म्हणून मन जों विवेकाचें प्रतिविष पिअूं लागलें तों तेंही, पितां पितां तरी विषासारखेंच दुःसह होणारच ! त्या विषप्रतिविषांच्या लहरींचा पहिला झटका, मनांतील विरह-विवेकांची ती खळबळ, त्या शिक्षेच्या पहिल्या दिवसाच्या कार्यक्रमाची 'आन्हिकी' ( Diary ) देणाऱ्या या कवितेंत स्वतः त्यांनींच त्याकपी पुढें ग्रथिली. ]

# सप्तर्षि !

( रचनाकाल–सन १९११ )

## ( आर्यावृत्त. )

आशाचि ! फलाशाची ! ! ऐक्या घावें धृती कशी तडके
मुक्ता[1] वदली त्याचें कष्टेंचि तसें मना तुझें मडकें १
गेहीं गेहीं स्वपुरीं फिरतो घेऊनि दीप हातीं तो
ज्यांसी हुडकूं निष्फल, परतुनी येतां गृहीं पहातो तों २
तस्कर ते अपुल्याची गेहीं निश्चित सर्व असलेले:
दीपा ! तुझ्याचि खालें पटल तमाचें लपूनि बसलेलें ! ! ३
स्मरुनी नैष्काम्याचा करितां उपदेश तें जगाला जो
स्पृहणीय दाविलासी उत्साह अदम्यसा, अगा लाजो ४
माझ्या मना ! तशा तुज हें मन माझें असें ! अहा साचा
हे सहस्राश्रू माझे फुगवीतिल पूर सदुपहासाचा ! ५
वत्सर झाले, झालें कारागृह गृह अनन्य मज; गमला
नचि मोह, न चंचलवी विरहाचा ही असह्य आग मला: ६

---

१ संत मुक्ताबाई.

गमलें, स्वभावची हा बनला निष्काम कर्म सांग तसें :
तो भास परि! मना! हा तवाचे निरुत्साह आज सांगतसे ७
न्यायालयांत होअिल निर्णय जो काय : ही अनिश्चितता
जाअुनि होतांचि अजी मोचन ना शक्य ही सुनिश्चितता! ८
स्फुरलें ना ह्मणुनि तुवां केला निश्चय मुळींच तें शमलें,
दिसलेना जें ह्मणुनी नाहितसेची मना! तुला गमलें : ९
पंथिं अनिश्चिततेचो परि ती विज्ञतांचि हृत्तमीं कुठले
लपले विकारतस्कर गेहिंच ते हे तुझ्यावरी अुठले! १०
आशाचि! फलाशाची! स्वार्थाची ना? तथापि आशाची:
विणितेचि परार्थाशा स्वार्थाच्या सम कठोर पाशाची: ११

लांब नअू न पदें जी रुंद पदें पांच ही नसे पुरती;
यद्भित्तींच्या भयसम काळें डांबर अलंकृती वरती: १२
खिडकी ना जाळी ना अेकहि; खोली अशीच अभगा, जे
बंदिशालेमधिं ही अेकलकोंडी ह्मणोनियां गाजे! १३
लोहगजांचें तिज हें दार अरुंदचि, दिनींहि कुलुपातें
लावूनि बंद ठेवायासी केवल! न चक्षु घूकातें १४
अितुकें पूर्ण विसंगत गमती! बाजूंसि अेकही न वसे
नीचाहि हो परि माणुस कोणि न बोलावया मिळे नवसें; १५
तैसेंची हें जेथें तरुपल्लव ही मिळे न नवसासी
अंगण अरुंद पुढती दुर्मुखलेलें, जयांत दिवसासी १६
वाळत अुन्हांत पडती कैद्यांची कांबळीं अणीं तरटीं;
कोटावरी समोरी बांधितसे घूक कावळा घरटीं. १७
मानव जाति-बहिष्कृत, पाहूं ही ज्या मनांत दचकावें,

अैक्या राज्यास्तवही ज्या संबोधावयासि वचकावें: १८
संवाद–प्रिय अितुका मनुज मनाचा निसर्ग ! पापांशीं
अैशांसही शिराणी गमतें बोलावयास, जैं पाशीं १९
वाग्दुष्काळाच्या ह्या तळमळतो जीव कीं तुरुंगांत !
चड्डी आणी बंडी खादीची रखरखीत अंगांत; २०
टोपी नामा पिंवळी झोळी झांकीत कवच माथ्याचें;
अेक चवाळें काळें, शयना कांटेरि तरट काथ्याचें, २१
स्नाना पाना प्रातर्विधि समयास्तवहि अेकची होतें
जलपात्र, अपात्रहि जें जस्ती हस्तार्थ मापटें हो तें, २२
जस्ती पदक प्रतिपदिं वक्षिं पुकारित सजा सदा रुळतें,
चरणांत लोहदंडा बेडी दुस्वन भयाण खळखळतें : २३
वाळे जिचे सकीलक–कंटक, ती तीन शेर वजनाची,
खाअी दैवहतांचीं सोलुनि जी सांतडीं नवजनांचीं– २४
बिलगे कटिसि ती, पद टाकूं नेदोच सहज दिवसाही,
वळतां स्वप्नीं पुसल्याविण डसतेची, न भंग लव साही ! २५
नव पद खोलीमाजीं जेअूं बैसे तिथेंचि जडकुंडी
हट्टे फुंकुनियां जी घाण, घ्राणा करीत रडकुंडी : २६
‘ तनु घृण्य ! निंद्य तनु ही ! ’ बोधित अवधूत कीं पिसा कोणी,—
शौचादि नित्य–कर्मा अेक अनावृत असे चतुष्कोणी; २७
खायासि खापराची थाळी, लंगोटि ही क्वचित्: सारा
संसार आमुचा हा ! शिकवी तदधिक अवश्य न पसारा २८
जितुका जनीं अवश्यक समजुनि झटताति लोक मिळवाया
अनवश्यक तो, ज्वर तो, क्षीण करी श्रांत मनुज-बळ वाया २९

प्रातःकाळीं आला कळवूं, कारागृहाधिपति मजला
झाली सजा अहा! हीं वर्षे पन्नास कीं पुरीं तुजला! ३०
अभ्यासकठोरहि तें हृदय तयाचें सखेद कळवळलें।
परि हें स्मित मद्वदना वरुनी, श्रवणें, न लेश मावळलें. ३१
तोंची वस्त्रें माझीं सहवासाचीं हिरोनियां मजशीं
देतां बंदीचीं, तीं केलीं धारण करीच राम जशीं : ३२
मंत्र तसाची वारंवार स्फूर्त्यर्थ मी तदा साचा
वर्णितरामविवासन जपतां तो श्लोक कालिदासाचा* ! ३३
जातांचि परी अधिपति सोडूनि मज अेकला सशृंखळ तो
सहसाचि लोट तत्क्षण दुःखाश्रूंचा अदम्य खळखळतो !! ३४
वर्षें पन्नास! अहा! वर्षें पन्नास हीं! अहा! वर्षें!
ध्वनि हा पुनः पुन्हां ही मजवरि पाऊस कीं तसा वर्षे! ३५
वर्णित-राम-विवासन मंत्रहि तो म्यां पुनः पुन्हां जपला;
चळत्या धैर्यासहची अुलटुनि बदली स्मृतीहि परि चपलाः- ३६
सीतेसंगीं अैशा अविकृत रामेंहि तव अहा कां ना
जातां सीता व्याकुळ केलें वन देत करुण हाकांना! ३७
अश्रु तुझ्या विरहाचे; वृत्ते प्रीते! न कोमला कां ही
शोभाची हृदयाची! प्रीते तुजविण नको मला कांहीं !! ३८
आणी पुनः पुन्हांही ह्मणतां माझ्याचि मी मना "नाहीं"
मुक्त्यब्द कवण पाही! सोडि अशक्या न कामनानांहीं. ! ३९

---

* ' दधतो मंगल क्षौमे वसानस्यच वल्कले—।
दहशु र्विस्मितास्तस्य मुखरागं समंजनाः ॥ कालिदास ॥

यावज्जीवन शिक्षा तीं वर्षे पंचवीसची गणती,
पापकृत्तमास्तव ही याहुनि बंदी अवैधची ह्मणती, ४०
होतो सिद्धचि शिक्षा शक्या अधिकांत अधिक ही भरण्या,
वर्षे आयुष्याचीं अत्युत्तम पंचवीस तीं करण्या ४१
कारानळांत हुत मी तिळतिळ जाळोनि देह, कार्यातें
अत्युत्तमाचि अुद्धाराया जननी स्वभूमि आर्या ते ४२
द्वीपांतरांतुनी कीं--धैर्यी अुत्साह अेक दे ह्याची,
येअू शकेन रक्षा ठेअू या पुण्यभूत देहाचीः ४३
'वर्षे पन्नास!' परी अैकुनि अुत्साह तोहि कोसळला !
सुकला तरंग अंतिम होता जो मृगजळांत सळसळला !! ४४
परचक्र दुर्विलासा—भोगी पडदा करूनि तमसाचाः
अपराध देश जागृति—परवश देशांत घोरतम साचा ! ४५
तरि कां शिक्षा जी मज यावज्जीवन भरोनि न सरे ही
अिच्छिति पर हे भरणें त्यां ती घेअूनि जन्म दुसरेंही ! ४६
'शिक्षेच्या परिसीमेची परिसीमा ! सुदुर्भगा ठाया
शक्त स्वप्नीं देखिल होअी मत्कल्पना न गांठाया ! ४७
दीर्घायूंची कीर्ती कृतिही स्मरली किती मनानें ती;
बंदींत त्या तओं मम थोराथोरांसि कामना नेतीः ४८

---

१ जन्मठेप ह्मणजे २५ वर्षे अशीच समजली जाअी. दोन जन्मठेपी ह्मणजे दुसरी लागेल तेथून २५ वर्षे—पहिली गणलीच जात नसे. पण दोन जन्मठेपी मोजून ५० वर्षे काळेपाणी—ही शिक्षा त्यावेळींहि अेक अतश्रुपूर्व गोष्ट होती ! शिक्षेची परिसीमा जन्मठेप—पण ही जन्मठेपेवर आणखी जन्मठेप—परिसीमेहून परिसीमा.

वर्षी अशीतेतमिं न[1]वरोजी क्षेत्रीं अुभा स्वराज्याच्या:
तो श्रीकु[2]मार खड्‌ा भीती देशघ्न भास्वरा ज्याच्या: ४९
तो डिझरा[3]यलि, तो तत् प्रतिपक्षीही[4], सुवाक्प्रभूवर ते
जे मल्ल झुंजती त्या लोकसभेच्या विवादभूवरते: ५०
ते जरि अैशींमाजी देती तिशिच्याहि यौवना लाजे
कां हे निराशता मज सुटकेची ही छळी मनाला जे ? ५१
श्री[5]भाष्यांची विणता पावन—वाक्कुसुम—शुभ्र—माला ही:
जो शुद्ध[6]बुद्ध भगवान् वीर पराभावि भवभ्रमलाही— ५२
तो बुद्ध !--अहा ! तों त्या तृष्णाच्छेदक पवित्र सत्स्मरणें
ये लज्जेनें माझ्या तृष्णाव्याकुळ मनाप्रती मरणें ! ५३
तृष्णासमर्थनासी आठवि माझी विमूढ आशा ते
तृष्णाच्छेदक त्याची मारजितासी--स्वकीय नाशातें ! ५४
सत्कार्यपिपासाही तृष्णा[7]चि न कां ? न सुख—विलासाची
तरि देशकार्य सक्तिहि विरहाहुनि जी छळी तुला साची ? ५५
वैतागें मी बघुनि धृतिचा ढळलावि नित्य नेम, गती
दु:खद होय; दिवाळें काढुनियां आपुलें मनें मग तो ५६
अपुली आशा पेढी जाळियली ! तों अहो कसें नवल !—
आशेच्या रक्षेंतुनि मंजूषा उद्‌भवे प्रभा—धवल ! ! ! ५७

---

१ दादाभाअी नवरोजी. २ सत्तावनच्या क्रांतियुद्धांतील स्वातंत्र्यवीर राजा कुमारसिंह हे अैशीव्या वर्षी अतुल शौर्यानें अिंग्रजांशीं लढले; अनेक रणांत विजय पाअून, समरीं पडले. ३ डिझरायली. ४ त्यांचे प्रतिस्पर्धी ग्लॅडस्टनसाहेब. ५ श्रीरामानुज अैशीव्या वर्षीहि प्रचारकार्य करीत असत ६ भगवान गौतमबुद्ध-हेही अैशीं वर्षे जगले. तसा मीहि जगून हो पन्नास वर्षें शिक्षा भोगून परत मातृभूमीत देह ठेवण्यापुरता तरी परत जाअूं शकण्याचा संभव कां नसावा ! हा भावार्थ. ७ समर्थांचें वचन 'स्वार्थ गेला ताटातुटी। जडली परमार्थ अुपाधी ' तुलनार्ह आहे.

मन अुत्साहें भरलें; गुरुकिल्ली जी कृपा महंताची
त्या तुकयाची लावुनि उघडुनि म्यां कुलुप तें अहंताची, ५८
उचली झांकण नैराश्याचें:—आंतुनि सुख—निधान असें
सर्वोपाधि—प्रभु जें, मोक्षाचें जें महाविधान असे, ५९
तें वैराग्य !—विनाश न अनुरागाचा विकासची[1] परि तों
चिंतामणि सम चमके ! चिद्गम्या मी महोत्सवा करितों ! ६०

बंदी पन्नासाचि ना वर्षें ? पन्नास कल्पना ही तो :
आभास—काळ केवळ, वस्तु स्थितिचा पदार्थ नाहीं तो ! ६१
बंदी ? ती आंत तशी बाहेरहि या शिवासि जीवाची:
पगडा तुजवरि पांचा वृत्तींचा तोंवरी न केंव्हांची ६२
आनंद गवसणारा मुक्तीचा—तुज तुरुंग मानस हा !
त्याचा बंदी जों तूं तो जूं हें वांकवूनि मान सहा. ६३
परि करुनि चित्तवृत्तींचा तूं अपुल्या निरोध, साम्यानें
मन हस्तगत स्ववशीं, ठेविशि कीं खड्ग हा जसा म्यानें; ६४
अीश--प्रणिधानाच्या[2] अुमजुनियां हृद्गता जसें जनकीं :
गुण वर्तती गुणीं, मी साक्षी केवळ तया निरंजन कीं; ६५
जें सत्य--परम शाश्वत—तेथें स्थापुनि अचंचला मतितें
अुपहसुनी तदिदर या गुणवृत्तींच्या[3] सहस्रविध गतितें; ६६

---

१ अनुरागाचा विनाश नव्हे (तो वैताग होय!) पण खरें वैराग्य म्हणजे अनुरागाचा विकासच होय.

२ ‘ अीशप्रणिधानाद्वा ’ पातंजल योगसूत्र.

३ ‘ गुणवृत्ति विरोधाच्च ’ योगसूत्र.

जरि डोलशील बापा परमानंदांत—कवण तुज तरि ते
अेकल—कोंडीं कोंडी ? किंवा अंधार कोठडी करिते, ६७
तू अंतर्ज्योते ! तुला अंधःकारांत घाबरा ? पाहे
सुख दुःखाचें साधन बाह्य न परि ह्या मनांत बापा हें ! ६८

राजगृहीं काय कमी ? पक्वान्नें पांच नित्य शिजतात;
प्रासादतल स्फटिकीं, कळस सुवर्णांत, घुमट रजतांत ६९
चमकत गर्वें घेती अनुदिन शतशतसहस्र मुजरा जे,
चतुरंग सिद्ध शब्दा झेलायासी खडी चमु ! जरा जें ७०
परि त्या प्रासादांचें निरखिशि तूं सूक्ष्म अंतरंग तसे,
जरि तोलशील कैसा पर्णकुटीचा महंत रंगतसे, ७१
उमजेल तरि तुला कीं बाह्यनिधींमधिं वसे न सुखधन तें
रागोपहतिर्भोगान्नाचि कीं, संतोष सौख्यसाधन तें. ७२
पक्वान्नें पांचाचि तीं नाहींत सहा ह्मणोनियां राजा;
कोणी बटीक अपुली साध्य न होअी ह्मणोनि युवराजा: ७३
सोन्याचेंचि कळस ते नचि रत्नांचे ह्मणोनियां राजा;
केला मुजरा कोण्या सामंतें ना, ह्मणोनि युवराजा : ७४
होअीन हाय ! केव्हां मी अधिराजा, ह्मणूनियां राजा;
राजा होईन केव्हां आहे त्याचा ह्मणूनि युवराजा:— ७५
दुःखी सदैव !! राजे झाले वेडे किती ! किती त्यांहीं
छळ सोशिले ! सुखाच्या दुखें घडल्याचि आत्महत्याही ! ७६
तो भीमसिंग[1], अेलाग्याबूलस[2] तो, शहा " जहानाचा[3], "

---

१ राजपुतराणा, वेड लागून मेला ! २ रोमनबादशाह. गिबनचा अितिहास पहा. ३ जहानाचा : पृथ्वीचा : शहा ! औरंगजेबाचा बाप.

माधव[1] गर्भ श्रीमंतींतचि मोठा न कां ल्हानाचा ? ७७
हें चित्र पहा--आणिक हेंहि पहा चित्र संत तुकयाचें
नित्यानंदीं फुललें मानस, हो मानसा[2] कुतक याचें ७८
मी डोंगरींत[3] बंदी असतां वृत्तांत परिसिला कानीं
होते सन्निध कोणी अवलीया, ज्या अनंत लोकांनीं— ७९
वंदू द्वारीं अनुदिन तिष्ठावें दाट, ते स्वयें बसती
अेकान्त; आत्मरतिनें डुलती झुलती मधेंच वा हसती ८०
परमानंदाचा जै सावे न हृदीं वरी उमाळा तो
उसळे ! पायाखालीं गालीचा जीर्ण कुसुममाळा तों— ८१
भाविक भक्तांहीं ज्या खिडकींतुनि फेंकिल्या, जशा गळल्या
भूवरि आंत तशाचीं फिरतां चरणीं धुळींत चुरमळल्या; ८२
बंद मठींत दुरोनी फेंकिति जन जें जिथें जसें पडतें
प्रातःकालीं खोली झाडूं ये त्या तसेंचि सांपडतें ८३
मोतीं, मखमल, मेवे--सांवरुनी त्या जरी निकें रचितो
तरि “ने ! कशासि येथें ? ने ने झाडूनि सर्व केराचि तो !” ८४
काकुळतीनें अैसें विनवुनि करवूनि, रिक्त खोलीला,
खेळे अवधूत पुन्हां परमात्म्याशीं पवित्र तो लीला ! ८५
दशवत्सर अेकान्तीं खोलीमाजींच त्या असे वसती
खाती किंवा निरशन आच्छादित वा अवस्त्रची बसती ८६
जेथुनि हिरवें अेकहि शेत, न वा मंजु विहग, वा सर वा
आकाशही दिसेना, नकळे कीं अब्दमास--वासर वा; ८७

---

१ सवाअी माधवराव : ह्या सगळयांचा दुःखदायी शेवट प्रसिद्धच आहे.
२ मानस सरोवर ३. डोंगरी तुरुंग मुंबअीचा.

जी नित्य अशी तमसाच्छन्नचि कीं ही मदीय काराही
अेकलकोंडीं किंवा भितुकी मढली न अंधकारांहीं : ८८
त्या कोठडींत अपरिग्रहं[1] दे सर्वोपलाभ ह्यां--यांच्या.
कैवल्यानंदाचा अवलंब वरी न बाह्य विषयांच्या ८९
'विषमप्यमृतं'[2] न 'क्वचित्' नित्यचि ह्यां सुखद दुःखविष, यांच्या
कैवल्यानंदाचा अवलंब वरी न बाह्य विषयांच्या ! ! ९०
दुःख सुखाचें केवल अवलंबुनि बाह्य विषय जें असतें;
सुखसत्व विशुद्धचि जें, सुख तें कीं आत्मरतितचीं वसतें. ९१

हें सत्य हृदीं चमके ! धृतिनें आकंठ मन पुन्हां भरलें;
मज कोंवि निरुत्साहें क्षणाचि परी कीं खिळूनियां धरलें ९२
झालें लज्जेनें या ओशाळें ! तनुभयासि नच नतसें
मन्मन मद्भक्तची तैं प्रथित स्मरलें स्वपूर्ववचन[3] तसें ९३
कथिलें जें म्यां देअूं दिव्योत्साहा तदा मदीय जना
यज्ञीं त्या जैं सजलों स्वप्राणाच्या करावया यजना : ९४
"पडले शत शत मत्सम तरि कां अगतिक असेल भारत,[4] हा !
श्रीकृष्ण सारथी यद्रथ हांकाया स्वयें अुभा रत हा ?" ९५

---

१ अपरिग्रह प्रतिष्ठायाम् सर्व रत्नोपलाभ : योगसूत्र.

२ हें कालिदासाचें अवतरण ' विषमप्यमृतं क्वचिद्भवेद् अमृतं वा विष मीश्वरेच्छया ! '

३ ' माझेंच पूर्वींचे पद मला धीर देतें झालें. ' तें पद ' पहिला हप्ता ' म्हणून ' Echo from the andmans ' या ग्रंथांत छापलें आहे.

४ मुख्य चिंता ही वाटे कीं क्रांतीच्या चळवळीचा ह्या आपल्या कारा बद्धतेनें मोड होतो कीं काय ! भारत हटतो कीं काय !—त्या शंकेचें ह्या पदांत समाधान आहे.

मूर्खा ! थांबेलचि कीं पृथ्वी कारेंत तूं जरी मरशी ?
उपहसत असें माझें वचनाचि माझ्यावरी करी सरशी ! ९६

निश्चिंताचि मग बसलों पळ मी, परि तें बघुनि रागेले
'नाअिक' सोळायासी काध्या लावुनि मला जरा गेले. ९७
श्रम ते शांत मनें मी लागे करण्या सवें करीं धरुनी,
स्वे स्वे कर्मण्यभिरत संसिद्धिसि लाभताति तें स्मरुनी. ९८
जातां सोळाया जो काध्या निघति स्वहस्त सोलोनी
पिंजुनि दिधला नियमित तितुका सोन्यासमान तोलोनी. ९९
तों दिवस मावळू ये; मग त्या होतों धरूनि नियमासी
चित्तैकाग्र्यासी मी साधित अेकान्त विगत षण्मासीं; १००
ख्यात विवेकानंद प्रभु तो जो त्या महावितृष्णाचा
शिष्योत्तंस श्रीमान भगवद्भूदेव रामकृष्णाचा; १०१
जडवादी अश्रद्धा मतिचा कांहीं विकल्प असत्याशीं
आह्मांसि कपिल पातंजलिसूत्रित त्या सुसूक्ष्म सत्यांशीं १०२
जडवस्तुशास्त्रभाषेंतचि जो पटवी, तदुक्तिनें पटतां
योग न गौप्य परी तें शास्त्र, करी अेक तंतुता पटता:— १०३
नियमानुरूप त्या मीं चित्तैकाग्र्यीं करावया प्रगती,
पुरती 'सक्तमजुरी' होतांची कीं धुवोनी कर मग ती; १०४
योगी राजाचा त्या ग्रंथ श्री राज योग मी उघडी,
शांत रसाचा पेला दूर करावा गमेचि जो न घडी; १०५
तत्रस्थ समाधिस्था तन्मूर्तिसि देवमूर्तिसमचि नतें
वंदुनि, नासाग्रीं कीं रोंवियलेंची सदृष्टि म्यां मन तें १०६

मन हें चंचल भारी ! दुर्निग्रह भासलेंचि साधुजना,
जडजीव अनभ्यस्ताचि त्यांत अज्ञीं; आवरोचि तें मज ना ! १०७
प्रिय अप्रिय हेंचि कळे, नकळे परि विहित वा तयास हित;
जिकडुनि तिकडुनि धांवे ठकवुनि बुद्धीस इंद्रियां सहित ! १०८
वेडा निसर्ग आहे मनुज मनाचा जरी असा पडला
तरि दुष्कर भूसेवाव्रतिं जो कांहीं करांत सांपडला १०९
निष्काम कर्म योगाचा मज ठेवा, तया बळें आधीं
लेश वशंवद होतें स्वच्छंदाची सुटोनि मन आधीं; ११०
यास्तव तें जरि जेव्हां तेव्हां अितरत्र सहज लव जातें
तरी पकडतांचि लज्जाहत दे सोडोनि वृत्ति भवजा ते. १११
घेतां घेतां अैशा वृत्ती ध्यानस्थ चित्तिं विलयातें
ये सुखद अनुभवाया आत्मरतीचा प्रसाद तिळ यातें. ११२
मोहक मोहक झरती शांत रसाचें हृदांत पाझर ते,
कैवल्यामृत निधिचे उडतां कांहीं तुषार ओझरते ! ११३
तिळही प्रसाद तुमच्या प्रभुजी ! मजसी अदृष्ट चरणांचा
जरि कीं शीतलवी पळ मज समही हो त्रिताप शरणांचा ११४
असणाराचि तें तरि कीं जे तव अधरामृतासि प्यालेले
हे केवळ ! त्या कैवल्यानंदाच्या पुरात न्हालेले !! ११५
वंदी वारंवारहि "कस्मै देवाय"[१] त्या ! तअीं भावें
लाभास्तव स्तवाहीं सद्गुरुच्या हें स्वचित्त लोभावें ! ११६
श्री रामकृष्ण जैसे अैकुनि जडवाद दिव्य हेतूचे,
मोक्षार्थीचि त्या अश्रद्धाचे, सत्यार्थ तर्ककेतूचें, ११७

---

१ 'कस्मैय देवाय हविषा विधेम' ह्या प्रख्यात वेद-ऋचें-तील त्या अज्ञेय देवाला !

अन्वर्थ नरेन्द्रांचे; "ओश्वर नाहीं' वदे 'वदावा; वा
आस्तिक्य सत्य: तरि तो मनसी प्रत्यक्ष देव दावावा !" ११८
स्पर्शुनि हंसले "बाळा ! अचिरचि तूं पाहशील देवाला !"
स्पर्शाचि त्या विवेकानंदा घे, केवळा न नांवाला !¹ ११९
स्पर्श तसा करुनि तसा देवा दाविल मला अहा काय
गुरु लाभे तो ? कुरवंडीन तयावरुनि आजि हा काय ! १२०

सकल गुरूंचा गुरुवर ! भगवान् श्री कृष्ण जी स्वयें कथिती,
अमृता अमृतास्तव जें धर्मक्षीराब्धिला पुन्हां मथिती; १२१
भिन्नमता गमताती यद्यपि बहु भिन्न दिक् प्रवाहांहीं
रस वाहिनी रसातळिं, गमतो निठुर विरोध वा हाही १२२
अंतर शत शत कोसाचें तें त्यांच्या पथांत पाहुनिया;
परि अचलाधिप शिखरीं निश्चळ कांहीं मुहूर्त राहुनियां १२३
विस्तीर्ण आसमंतात् भूमीचा चित्रपट अशेषतया
दृष्टि क्षेपीं घे त्या नाढळे तो विरोध दोष तया: १२४
ऐक्याचि द्यौस्तनाच्या पिउनि पयासी अनंत मार्गानें
प्रभु नियत कर्म करितां, शस्यें, सुफळें, जळें, फुलें, गानें, १२५
तत्तद्योग्यें भोग्यें नानाविध रंजवीत देशातें
ऐकाचि नद नद्या त्या अंतीं आलिंगितो नदेशातें:–² १२६
ज्ञान भक्ति कर्मादिक धर्ममतें तेवि साम्यता वहनी
योग्यीं अनन्य योजक गमती अत्यधिकेचिया वहनी १२७
तत्त्वप्रभसौवर्णाद्रीच्या ज्या, जीव यद्बळें तरती
श्रीमद्भगवद्गीता भावानें वाचिली अनंतर ती ! १२८

---

१ विवेकानन्द स्वामी. २ नदेश–समुद्र.

छाया सांजेची ये तों कीं, पुढती दिसेन वाचाया;
मग जो ब्रह्मीभूतचि, असतांही देह मानवाचा या, १२९
त्या तुकयाच्या भावें भक्तिरसपरिप्लुता अभंगा या
लागे, व्यायामा मी फिरतां नवपद बिळांत त्या, गाया: १३०
दंडा बेडींचे जे वाळे ते टाळ करुनियां नामी
भजना त्या गुणगुणतां वाजविले ताल धरुनि यांना मी. १३१
रात्री अर्धमुहूर्ता: नगरांतुनि देवदर्शनें करुनी
गृहिणी गेहीं येता प्रज्वलिती वन्हि धूम फुंकरुनी, १३२
हस्तीं जुईसम सुरभी धुतले तांदूळ घेत असतांना
स्मरताति दशन मुकुला अपुल्या बालाचिया विहसतांना; १३३
गुणगुणत गीत कांहीं, लगबगिनें भात वैरुनी, त्यांहीं
नसतील अजुनि त्याळीं वस्त्रेंही सोवळीं सुदत्यांहीं: १३४
सायंकाळ असा कीं रात्रीं माजीं पुरा न जो विरतो
तों निर्दीपा अेकलकोंडीं भवतीं तमानिधी भरतो ! १३५
आणी फेंकित किरणा, मज केवळ दाविण्यासि तम कां तो !
आसन्नमरण नाडी जेवीं निस्तेज तेविं चमका तो १३६
अपुल्या मधेंचि घेता, पाहुनि ज्यांना न घूकही पळतो,
कंदील एक मिणमिण अंगण सोडुनि पलीकडे जळतो. १३७
लोहगजाच्या दाराजवळीं येऊन सहज मग बसलों;
बाहेरच्या तमासचि जातां डोळे बघूं तयां हंसलों: १३८
दृक्शून्य तमीं नयना भुलवुनिया दृश्य कोणतें तें ने !
जो धर्म इंद्रियांचा करुं तो धांवेचि तें अवशतेनें ! १३९
बसलों तों दिसली मज तेजाची चमक अेक ओझरती
लवुनी निरखी पुनरपि तों चमके चांदणी नभीं वरती ! १४०

जोतिर्विद ते जैसे अवकाशाची पुनः पुन्हां गणती
करुनी शतदां, वेधा साधुनि, शोधावया नभोंगण, ती १४१
डावी, उजवी, पुनरपि कलती, वरती, तशांत अति, कमती,
नलिका सुदर्शनक्षम करण्यासी दूरदर्शिनी भ्रमती: १४२
मी मान तशी शतदां त्या लोखंडी गजांसि रोंवुनियां,
तिरपी शिरपी परि ती रोधें त्याची स्वदृष्टि खोंवुनिया १४३
त्या फटितूनी दिसली चमक जिथोनी; सर्वेंचि देहातें
मुडपुनि फरशी वरती खालीं, धरुनी गजां वरी हातें, १४४
ऊर्ध्वमुखाकुंचित तनु, देवा सन्मुख सुभक्त कीं नतसा,
स्पष्ट दिसावें नभ त्या कोठडितुनि साधिलाचि कोन तसा ! १४५
कोर लहान नभाची दृश्या येथुनि, परंतु संगम ते
सप्तर्षींच्या साताmाळांचें तींत ! बघुनिया गमतें १४६
विलसे न विरल तारक नील नभाची समोर कोर, मला
देवी अनंततेच्या चुनडीचा पदर पालवी गमला ! ! १४७

—२—

भास्वान वदताति तुला, हे भानो ! विश्वचक्षु मिरवीशी
पदवी तूं: तेजानें आह्मां अपुल्या पदार्थ करवीसी १४८
दृश्य अशेष धरित्री वरिलें ! जैं हुडकिता उषा युवती
येशी अरुण–पुरस्सर पूर्वेला तूं प्रभाकरा ! तंव ती १४९
प्रत्येक कीड मुंगी मशक रजःकणहि सूक्ष्म असतांना
ठेले दृग्गोचर जया तुझिया तेजें, मनांत नसतांना १५०
संशय किमपि तशां त्वां लपवीलीं हीं सहस्र असशील
ब्रह्मांडें मनुजाच्या दृष्टीपासूनि, तुजसि सच्छील १५१

अकृत्रिम कृतज्ञ पूर्वज दिवस असे बोलुनी अनंतर ती
जी ये रात्रि ह्मणुनि तिज निर्देशक गणुनि तैं स्वपा करती: १५२
ऐक्या ग्रहासि दावुनि लपवी शतसूर्य मालिका तो का
जी श्रीकृष्णमुखासम दावुनि विश्वस्वरूप दे तोखा, १५३
—कवण यथार्थ तिमिस्रा ? दृक्साफल्यासि देसि तूं कां ती ?
सोनेरी तव किंवा दिव्यतरा श्यामला तिची कांती ? १५४
येअि असा संशय कीं दिवसकरा ! उगवतो कदा भुविस
अुदयानंतर किंवा अस्तानंतर तुझ्या खरा दिवस ! ! १५५

तुच्छ अुपग्रहची जो स्वयमपि परभुक्त भूग्रहाचा कीं
धावे दिनरात तिच्या, दासीचा दास, बद्ध हा चाकों, १५६
अुच्छिष्ट सूर्यकिरणां चोरी लावूनि भूमिचा वशिला
मिरवी मग जो त्या सित छत्रा अपुलें तसेचि; त्या शशिला—१५७
निर्जीवन नीरस निस्तेज कलंकित तनूहि ते ज्याची,
त्या वदती तारापति !--सप्तर्षींनो, अनंत तेजाची १५८
जगतेंचि सात तुह्मीं--तुह्मां तारे ! असेंचि हो तात,
चोर ऋषींचे राजे बुध्यंधांच्या पुरींत होतात ! १५९

क्षुद्रधरेवरिला मी अत्यंत क्षुद्र अेक कीटक तों
अपुल्या वदनावरती बसलों लवूनियां निकी टक तो १६०
तें कां दिसे तुह्मांसी ? कीं किरणाश्वा असे पिटाळुनिया;
बसताति पहारे हे शत मजवरती तथापि टाळुनिया; १६१
कोणी न साह्य व्हावें, मजसी कोणी न शब्द बोलावा,
द्यावा सहानुभूतीचा ह्या जळत्या हृदासि ओलावा, १६२

भिंतीभवतीं भिंती, कुलुपावरती कुलूप जरि टपलें,
चुकवीत तया सर्वां तुह्मीं मज भेटलांतची अपलें ! १६३
ऋषियोग्य, ऋषीश्वर हो, अुपकारा अुपकृतें किती म्या तें
वानावें दीनदयालुत्वाच्या युष्मदीय महिम्यातें ! १६४
बंदींत मज बघूनी कां ते तुमच्या हृदात कळकळतें ?
कळकळतें मज बघुनी हृदय असें कां तुह्मांप्रती कळतें ? १६५
अथवा वाहे वारा मंजुल, मोहक सुगंध सुमनांचा,
निरपेक्ष अुपकृतितें करणें किंवा स्वभाव सुमनांचा, १६६
तेंवि प्रकाशताचीः कां तें चिंतुनि न वा कळूनहि तें,
साधित तमोहताची, सप्ताग्निंत त्या स्वयें जळून, हितें ? १६७
सप्ताग्नींत जळोनी काय स्वर्गांहि साध्य साधितसा ?
कीं ब्रह्मचर्य पालनिं संसाराचा नसे अुपाधि तसा ! १६८
तरि रविमाला अमुची वारी अमुच्या जशी तमाळा ही
वारूं तमा कुणाच्या झटती भवदीय सात माळाही ? १६९
किंवा ऋषी पुरातन तैसे तुह्मो ऋषी असूनीही
भोगा गृहस्थता त्या ललनालिंगन सुखीं वसूनी ही ? १७०
तरि पांडवांसि तैसी सातां अेकचि तुह्मांसि अभिरामा
भोगूं भूललना ? वा अेका अेकचि जशी सती रामा ? १७१
ज्या[1] अेक भूत--धात्री स्वकरें स्पर्शुनि ने समुद्ररशना ही
स्थापी तिच्यांत केवळ गर्भा, अन्य स्त्रियांसि वश नाहीं, १७२

१ सूर्याची पृथ्वी ही पत्नी असा भावः कारण ती भूतधात्रीः तिची समुद्र रशना तोच स्वकरें स्पर्शून तिच्यांत भूतमात्राचा गर्भ स्थापतो! श्लेषात्मक अर्थ स्पष्टच आहे.

सद्धर्म भीरु अमुचा भानु व्रत हें सदा करी नतसा;
तुह्मांत अेक पत्नी, सप्तर्षींनो, जरी कुणी न तसा १७३
संयमशील तरि तया अेका पत्नी अनेक कां वरती ?
अेक्या सूर्याभवतीं तुमच्या पृथ्वी अनेक कां फिरती ? १७४
सेतु विमानांचा कां पृथ्वीमध्यें असेल त्या केला
जाअूं प्रेमास्तव वा विजयास्तव राम जेवि लंकेला ? १७५
चित्र विचित्र पसरुनी मोर असेची तिथें पिसारा तो
नाचे सस्पर्ध अणी वन पसरुनि कुसुमवृंद सारा तो ? १७६
तेथेंहि मृगजलाच्या मार्गे हरिणें अशींच वामांगें[1]
आणिक धांवति मानव प्यायासी कां सुखासवा मार्गे ? १७७
विद्युच्छास्त्राची ही विद्या अवगत असे तयां[2] कां तें ?
वाही सागर पृष्ठावरती अैशाचि बाष्प नौकांतें ? १७८
किंवा शास्त्रपटुत्त्वीं आह्मांहुनि अर्हताति मानातें
मेघामार्गे लागति पळवुनि तद्वाल कां विमानांतें[3] ? १७९
रस, रूप, गंध, शब्द स्पर्शासी जाणतोच तनु ज्यासी
वसती वसुधेवरती अपुल्या आह्मांसमान मनुजांसी ? १८०
अुत्क्रांतिगतिपरत्त्वें वा जे अिंद्रियरसासि अनुभविती
पांचाहुनि या अधिका, नानाविध जीं विकीर्ण हीं भवतीं, १८१
आह्मासि अगोचर परि यास्तव गोचर जयाप्रती असती
गौप्यें विगूढ सृष्टीचीं, कीं मानव असे तिथें वसती ? १८२

---

१ वामांगेंसुंदर.

२ सप्तर्षींच्या भोंवती भूगोल असेल तर त्यावरील लोकांस.

३ कविता रचली तेव्हां विमानांची युक्ति मनुष्याच्या पूर्णपणें कह्यांत नव्हती.

सूर्यापासुनि जितकी पृथ्वी अमुची सुदूर ना तितकी
मंगळ अमुचा जितुका सूर्यापासुनि समीप ना अितुकी— १८३
पृथ्वी तुमची असतां अैशा मध्यंतरांत फिरतांना,
तुह्मांपासुनि तेजो गर्भा अेवं विशिष्ठ धरितांना, १८४
अश्रुत, अतर्क्य, अद्‌भुत, अुत्क्रांतीच्या क्रमा तिथें होतें
प्रादुर्भवन ? भुवन कीं आमूलात् भिन्न विभवची हो तें ? १८५
बांधुनि विमानमय दे गगनीं लीलापुरासि अधरासी
हाही ललना प[1]ण ते पुरवुनि पीती रसाळ अधरासी ? १८६
पवना[2]कर्षितसत्त्वाहारी होतां, विलुप्त हत्या ही,
भूगामी, जळगामी, गगनग वा भूत मात्र जें त्याहीं, १८७
करूनी संघटना कां अैक्या राष्ट्रांत अेकराष्ट्र प्रभुच्या,
भूतदयेच्या ध्येया करुनी वास्तव, सभेंत त्या विभुच्या १८८
मृग, मत्स्य, सिंह, मूषक, नाग, कपी, श्येन, चटक, वा, नर ते
पंजांकरवीं ना परि पंचांकरवी सुनिर्णया करते ? १८९
मंजुलतेसहची कां संगीतावरि सुगंध झुलताती ?
कां त्या सुगंधतेसह गीतें चंदन वनांत फुलताती ? १९०
वाचा फुटे गुलाबा ? किंवा फुलती गुलाब मनुजाला ?
सांगा सप्तर्षी हो ! काय चमत्कार जो तिथें झाला !! १९१

त्या शामकर्ण तुरगासम रामाच्या, नभीं हि अधृत रणीं
जो किरण अिथें ये हा, मागे सारित अनेक ते तरणीं, १९२

---

१ पण —प्रतिज्ञा, मागणी स्वयंवराचा पण.

२ वायूंत नायट्रोजन अित्यादि घटक. त्यांचा अन्नाचें ठायीं अुपयोग करून अन्नाच्या पुरवठ्याचा प्रश्न सुटला; ह्मणून जीवनकलहही गेला.

तुमचा किरण, ऋषी हो तुमच्या पासूनि तो कधीं सुटला ?
दिसतां मज यत्तेजोबुद्बुद कृतकार्यसा सर्व फुटला ? १९३
जवनांत जवन अपुले घोडे भरधांव सोडुनी पवनें,
जरि चेतवावया त्या अधिकचि पाठीवरी वनोपवने, १९४
चाबुक हजार–पाती ते सडकीले तडाड जों तुटती
तरि ज्यांपुढें मशकसे बाजी माजी पळांतची हटती, १९५
जरि त्यांहि, हे प्रकाशा, तुरगांसी तूं तुझ्याहि चपळांसी
सोडिसि सप्तमुखांसी, दवडुनि जळही पिऊं नच पळांसी, १९६
आक्रमित पळोंपळिंकीं कोसांच्या अेक अेक लक्षा या
तरि लागतील शत शत वर्षें आश्रम यदीय लक्षाया, १९७
अैसे नभस्तपोवनिं करित तपस्या पिऊनि आतप ती
सप्तर्षीं हो ! तुमच्यासम नांचे कां ते दुजे ऋषी तपती ? १९८
तरि जो प्रत्यावर्तित शतकांपूर्वीं प्रकाश भूवरिला
तो आजची अद्दा त्या ताऱ्यांवरती असेल कीं धरिला ! १९९
धरिला असेल तरि कीं छायालिपीही, ऋषी ! धरा होती
जी त्यां किरणांपाशीं, पाहूं कैशी तदा धरा होती ! २००
हाडें हुडकित अुकरित भूस्तर, शुष्कौघ, भग्नसेतु, कडे,
मरुभू, पर्वत; जुळवित पत्रांचे कीट गळितसे तुकडे, २०१
हे अैतिहास संशोधक वेडे श्रम कशास करिताती,
तर्क वितर्कांमध्यें सत्याचा शेष जीव हरिताती ! २०२

---

१ वनोपवने हेच हजारपाती चाबूक. २ किरण हेच तुरग. ३ ते सप्तमुखी कारण त्यांत सात रंग असतात. ३ छायालिपिः फोटो. पृथ्वीवर कांहीं ताऱ्यांचें किरण शेकडो हजारो वर्षांनीं पोचतात नि त्यामुळें त्या ताऱ्यांवर हजारोवर्षांपूर्वींचे पृथ्वावरील ते ते प्रसंग आजही प्रत्यक्ष दिसूं शकले पाहिजेत.

असुनी अुपाय अुत्तम अैसा दवडित तया सदा वाया
अघटित सोय असोनी घटना प्रत्यक्ष त्यांस दावाया । २०३
दावीलचि जी आणी त्या त्या ताऱ्यावरील घटनाही
प्रत्यक्ष । आनुमानिक लागत पट वा जुनाट घट नाहीं ।। २०४
—केवल विमान तत्क्षम[1] घेअुनि अुड्डाण व्हाल हो करिते
वातावरणीं, वातावणाभावांत वा, नभीं जरि तें: २०५
केवल जरि साधुं अणी, सकुटुंबचि कीं निघाल, मनुजहितें,
अयुताब्दलभ्य ताऱ्यांसी कीं पोंचोंत पथज तनुजहि तेः २०६
—तरि हो प्रत्यक्ष पहा कैशी झांशीकरीण अमरातें
लढवय्यि समरलक्ष्मी लक्ष्मी लढवी स्वधर्म समरा ते ! २०७
त्याच्याहि पलीकडच्या ताऱ्यांवरुनी स्वयें पहा कां तें,
पाझरवितील पाषाणांसी अैशाहि भूप हांकातें २०८
:' दे बंधु ! दान जीवन ! दे दे ! " अैकूनि हाय ना, प्रखरें
लोभें मारी बांधव, कथिती जे द्वेषदुष्ट विप्र, खरें ?[2] २०९
—मारी तो ! जो श्रीमान् भारतनृपधर्म मूर्त अवतरला
सुश्लोक राजयोगी योगीराजा अशोक भव तरलाः २१०
निर्मल हिमशीतल यद्वचनीं भवतप्त जीव लोभावा,
धाडी देव कधीं तरि—सत्यचि जो देवदूत शोभावा, २११
त्या शांत दात भगवद्यश—पावन येशुच्या पदा नमुनी
देखा पुनरुत्थाना[3] घे कीं तें करुनी आत्मदान मुनी ? २१२

---

१ त्या कार्यास क्षम. सप्तर्षीवर आणि पुढें वर अुडूं शकणारे विमान.
२ अशोकानें भावास ठार मारलें तें खरें कां पहा.
३ येशूख्रिस्त खराच जिवंत अुठला कां पहा.

जोंवरि मानव जगती जगतीं ज्याचें न सुयश हो मरतें
देखा गाअी रचुनी अीलीयड कां स्वयेंचि होमर तें ? २१३
मांक्षिक[1] देशीं सत्यचि जाअुनि कीं भारतीय वसताती
श्रीरामचरणकमळीं त्या अुपवनिचेहि मधुप रसताती ? २१४
वीस सहस्रें वर्षें गणुनी, तत्काळकिरण आज गती
घेता घेतां, कवण्या तान्याच्या तो असेल हा जगतीं, २१५
त्या तान्याचें वरतीं मग वीक्षण जाअुनी करा हो तें
केंव्हां आर्यावर्ती करिती आर्यार्षि ओक राहों तें ? २१६
कां उत्तर ध्रुवींची देवासुर ते पुनः पुन्हां लढले
त्या[2] मंथनांत ? रूपीं मोहनिच्या व्हा परी न हो गढले ! २१७
तो हिमांनिधि[3] किंवा तो हिमकरची मूल लोक पितरांचा ?
प्रभव पहा, प्रलय पहा, जीवाणूंचा[4] तसाच अितरांचा २१८
अितरांचा ? केवल जे भौमिक त्यांचा ! न शक्य सकलाचा !
विश्वैतिहास लिप्से, तुजसी वेढा अकाट्य त्रिकलाचा ! २१९
कल्पविमानीही कीं तूं तान्यांचे जिने करूनि नभीं,
जाशील उंच शोधित शोधित कितिही जरी धरूनि न भी, २२०
--अितिहासाचें पहिलें पान न मिळणें कधीं पहायातें,
'आरंभ तुझा दुसऱ्या पानापासूनि' शाप हा यातें !! २२१

---

१ मेक्सिको देशांत हिंदुच्या वसाहती पहा—तिथे रामलीलेचे अुत्सव त्या हिंदु वसाहतांत असत ह्मणतात तें खरें कां पहा.

२ समुद्रमंथन पहा,

३ हिमनिधि—बर्फांचा अुत्तरध्रुवीय समुद्र.

४ मनुष्यांचा प्रभव शोधीत शोधीत मूळ जीवाणूंच्या मूळ अुत्पत्तीपर्यंत सगळें बघा.

मग जें सांगू सारें सांगति जें जें मनासि मानवतें,
अितिहास कथन ना ! अुपहास कथा त्या रचीत मानव तें! २२२
कीं ह्या गगनांत तुह्मांसम पहिल्यानें अनंत हे खचिले
तारे प्रभुनें 'रंजवु मनुंना !' मनुजार्थ विश्व हें रचिलें ! २२३
मृग मत्स्य निर्मिलें कीं आह्मीं खावें तया, न राखावें;
(तरि कां सिंह व्याघ्रहि कीं त्यांनींही अह्मा नरा खावें ) ! २२४
विस्तृत सागर झाले खारट आह्मासि मीठ द्यायातें !
झाले उन्नत पर्वत, गहन वनें, सत्वरा नद्या या, तें २२५
आह्मीं करुनि कृपा कीं त्यां भोगावें ह्मणूनि खटपटती !
आह्मांविण निर्मिल्या विलया जाअील सृष्टि झटपट ती !! २२६
वाघूळ जशी पायां अुर्ध्व टांगूनि आपुल्या वरती
मानी मनांत माझे पायाचि आकाश अधर सांवरती ! २२७
जाळीं स्वयंमहत्ता मोहाच्या या तसेचि फसलेले
दंतकथांसी मानुनि धर्मकथा जे विमूढ बसलेले, २२८
ते पाहती न कीं भू करण्या अडदांड दुष्ट हेतूनें
गांठूनि भरडली जरि जळत्या दाढांत धूमकेतूनें, २२९
या वैश्व कारखान्यामध्यें भासेल अुणिव ना तितुकी
चुकतां अेक मशक या भामे पक्षागणांमध्यें जितुकी ! २३०
आह्मी किती ! जियेसी अचला विश्वंभरा स्थिरा धरणी
गौरवुं असे तिचीही हीन दशा ही ! परंतु तो तरणी ? २३१

---

१ कित्येक बायबल कुराण प्रभृति पुस्तकांत सृष्टयुत्पत्तीचा घाट असा मानवाच्या सुखसोईसाठीं झाला असे गंभीरपणें वर्णिलें आहे.

हा रवि अमुचा, ज्याचीं अेक न पारें कीं त्रिविक्रमख्याती
ज्या वेद 'विश्वकर्मा' देती देवा सुभव्य आख्या ती!-- २३२
अजि तेहि सूर्यनारायण ते अमुचे ! नभांत दिसते ही
जी दिव्य वियद्गंगा--तींतिल उडते तुषार अजि तेही !! २३३

कीं जें गणितां गणितां, ऋषि हो ! आधींच गुंगवी मतिनें
महदंतरावरी त्या घेत असा कीं तुह्मीं जिथें स्थितिनें २३४
तेथेंहि जरी तुमच्या नरतीं लावूनि दूरवीक्षण तें
होतील तुह्मांवरिले ज्योतिर्विद कीं पुन्हा असे गणते, २३५
महदंतरावरी तरि पुनरपि अितुक्या सुदूर बसणारे
असतील तुह्मांवरिही तारे दुसरे तयांस दिसणारे २३६
त्यांवरि ? त्यावरि ? त्यावरि ? हे प्रभु ! ओतूनि दिव्य हेमजलें
अेकावरिअेक किती अससी राचेले असंख्य हे मजले ! २३७
होय असंख्यात तयां अंतिम जो--त्यांवरी ? तया वरती ?
नयनें मिटुनी पुसतां पुसतां प्रश्नावली न आवरती ! २३८
विश्वस्थितिमर्यादेचा जो तैं होय विस्मिता मतिला
संस्कार अमर्यादित, मर्यादित वाङ्मयीं जरी कथिला २३९
तरि किमपि तदर्थकसा गवसे अुद्गार हा हताश तदा
अनंत ! अनंत !! अनंत !!! वदुनी वदणें अनंतची शतदां ! २४०

वारूळ तुच्छ भूचें, मानव मुंग्यांसमान वावरती
तुच्छांतिल तुच्छ तरी मोहुनि अपुल्याचि वैभवा वरती २४१

---

१ सूर्याला त्रिविक्रम--तीन पावलांत भुवन ओलांडणारा ह्मणतात.

क्षणिक किती, क्षुद्र किती ! आशा आनंद शोक हे अमुचे
विझणार अेक दिवशीं, ऋषि हो ! हे सात सूर्यही तुमचे ! २४२
प्राणासमची अपुल्या पाहूनी प्रियतमासि मरतांनां,
कीं योगयुक्तचित्तें भगवद्गीतार्थ मनन करितांनां २४३
अुपरति नेघे मानस कवणाचें कीं जरी पुरें विटुनी
थापांसि चटुल आशेच्या या, ग्रंथी हृदांतल्या तुटुनी, २४४
आश्चर्य गमे तरिही तें नचि; आश्चर्य हें मला गमतें
ज्योतिर्विदाची कीं ज्यांनीं केलीं अधीत सांग मतें २४५
जे विश्वदर्शना ह्या बघती अनुरात्रिं,--तेहि धीट कसे
ज्योतिर्विद कीं संसाराच्या जाळ्यांत गुंग कीटकसे ! २४६

ना हे तारे ! ते ना वेदहि ! दिव्याक्षरें अशीं प्रखरें
दि[1]ग्पत्रिं वेद हेची प्रकटविती जे अपौरुषेय खरें !!! २४७
ह्यो दिव्य वेद ! तुमचे अर्थ स्फुरती तुह्मां प्रती कां ते ?
कां सार्थता मनुजसंवदेनिंची ये तुह्मां प्रती[2]कां ते ? २४८
तरि कां मज्जा पिंडीं ब्रह्मांडालय अनंत तेजाच्या ?
अंतें[3] मनांत तया हें मनची मानी अनंतते ज्याच्या ! २४९
नयनावांचुनि रवि ना ? तरि रविवांचूनि नयन कां होते !
बीजतरूचें कोडें सोडवुं भिन्नचि वदूं नका हो तें ! २५०

---

१ आकाश पत्रांवर नक्षत्रे हींच रुपेरी अक्षरें खरे अपौरुषेय वेद प्रगटावितात !

२ प्रतीकः चिन्हें. तुमचे तुह्मांला अर्थ कळतात, कां तुह्मी चिद् शक्तिशून्य असल्यानें माणसांच्या संज्ञा शक्तीनेंच तुह्मां जडांचा अर्थ लागतो.

३ तर काय मन आहे तोंवर जग आहे ! मनाबाहेर ह्या पसाराच वसत नाहीं !

हे तेजाचे सागर होतिल अपुल्या क्रमेंचि पेयांचे;
पृथ्वी, प्राणी, मानव संज्ञावत्त्वा स्वयेंचि घेयाचे: २५१
आह्मां मनुजांची ही पार्थिवता घेत शतविकारांशीं
व्युत्क्रम परंपरेनें तेजाची हो न होत कां राशी ? २५२
तुमचे अंह्मांत असे अमुचें तुह्मांत रूप ओसरतें
सरतें रूपद्वैत प्रकट तरी सत्त्व अेकची अुरतें २५३

सप्तर्षी हो ! असें तुह्मांसी तत्त्ववाद ते करितां
हा बाष्पबिंदु माझा सिंधुत विश्वाचिया अहो झरतां: २५४
दिवस वसंतीं तैशी गेली कारागृहीं पहा रातीं !
येतो आतां आज्ञा निजण्या दे बदलतां पहारा[1] ती २५५

अंधार कोठडीच्या हरण्या हृदिंच्या तशा तमाला ही
मज विश्वदीप्ति संतत तुमच्या देवोत सातमालाही २५६
रुद्राक्षांच्या तैशा यदलाकें या साज सातमालाही
त्या व्योमकेश[2]देवा वाही कविता सदुत्तमाला ही ! ! २५७

—×*×—

---

१ तुरुंगांत रात्रीं फार जागूं देत नाहींत. पहारा बदलला कीं निजलेंच पाहिजे.

२ आकाश ( व्योम ) हेंच ज्याचे केश आहेत ! ह्या अुभ्या विश्वालाच महादेवमूर्ति कल्पिलें असवें. असे केसांत चंद्र, आकाशगंगा, असते ह्या वर्णनावरून आणि 'व्योमकेश' नावावरून भासते ! या साऱ्या चमकणाऱ्या देवांची समष्टि मूर्ति ह्मणूनच तो 'महादेव'!



गानफुलें

परडी ४ थी.

१ मरणोन्मुख शय्येवर.

२ हिंदु नृसिंह.

३ जगन्नाथाचा रथोत्सव.

४ अनंताची आरती.

# मरणोन्मुख शय्येवर !



## ( सन १९२१ )

[ **परिचयः**—१९११ ते २१ पर्यंत अंदमानामध्यें तुरुंगांत स्वातंत्र्यवीर सावरकरांची प्रकृति अेकसारखी बिघडत जात अंतीं क्षयावर जाते कीं काय अशी डॉक्टरांना देखील भीति पडली असतांना व केवळ थोड्याशा दुधावर राहून अंथरुणास महिनोगणती खिळून पडलेले असतांना मरण बरें असें वाटू लागेः अितकेंच नव्हे तर तें अेकदां अगदीं अंथरुणाशीं येअून ठेपलेंही !—त्यावेळेस मृत्यूच्या त्या गंभीर छायेखालीं ही कविता लिहिली गेली. ]

रचनाकाल सन १९२१. प्रथमावृत्ति १९२५

# मरणोन्मुख शय्येवर !



( वैनायक वृत्त. )

ये, मृत्यो ! ये तूं ये ! यावया प्रती
निघालाचि असशील जरि ये तरी सुखें !
कोमेजुनि जावया भियोंत हीं फुलें;
हीं द्राक्षें रसरशीत सुकुनि जावया;
भ्यावें तें कां ह्मणुनी तुजसि परी मीं !
माझ्या पेल्यांत किती पीत राहिलों
तरि न संपतीच अशा असति आजि या
अश्रूंच्या मदिराची मात्र राहिल्या !
ये ! त्या जरि नैवेद्या असासि भुकेला !
आणि जरी दिवस असे अजुनि तरुण हा
तरि लहान थोर अशीं असति संपलीं
दिवसाचीं कार्येंही बहुत करुनियां:
तोडजोड करुनि परी फेडलीं ऋणें
जन्मार्जित जीं जीं तीं: ऋषिऋणाप्रती—
श्रुतिजननी चरणतीर्थ सेवुनी कधीं,
धरुनि कधीं ध्रुवपदासि संततीच्या
आणी ही आचरुनी अेक तप अशी
आशेच्या या श्मशानभूत तपस्या:

देवऋणा—फुंकुनि रणशृंग, दुंदुभी
धडड धडड पिटुनि, आणि तो अघाडिचा
चढवुनि तैं हल्ला सहसाचि, ज्या पळीं
सुटली रघुवीराची प्रथम रणाज्ञा:
आणि त्याचि रणयज्ञाग्नींत पेटल्या
अस्थि अस्थि, मांस मांस, अधनें तशीं
जळत जळत आज असे शेष राहिलीं
राख यौवनाचीं मम! आणि ह्मणुनिची
फेडाया पितृ—ऋणासि आजि अहो मीं
शास्त्रातें अनुसरोनि, दत्तविधानें,
निपुत्रिकत्व वारियलें: पुत्र अखिल हें
अभिनवभारतची मम! जेथ जेथ कीं
पाळण्यांत विकसतसे नयन कमल तें
तेथ तेथ मींच बघें सृष्टि कुतुहला.
नवअुन्नति शील भाळ पटालिं दिसत जैं
अुदयोन्मुख तेज तरुण, तैं पुनः पुन्हां
माझ्याही अुदयोन्मुख होति हृदीं या
आशा नव, आकांक्षा अुच्च, भावि त्या
आमुचिया वंशाच्या गौरवाचिया:—
भारतीय केवळना, मानवीयही
वंशाच्या गौरवार्थ ! अखिल मानवी
यौवनांत अनुभवीन यौवनास मीं
आणि पितर माझे ते प्रेमतर्पणा:

येंअिं सुखें मृत्यो तरि—असति हीं अशीं,
तोड जोड करुनि परी, फेडिलीं ऋणें.
 आणि बहुत करुनीयां असति संपलीं
दिवसा[1]चीं कार्येंहीं: यद्यपी कधीं
अुगवे हा दिवस, कधीं मावळेहि वा;
कर्में वा कवण, कशीं कार्य, या दिनीं,
याविषयीं पंचांगें भिन्न, भिन्नचीं
भट्ट आणि पंडित[2] हे कथिति मज कथा;
तरिहि लोकसंग्रहार्थ, धारणाप्रती
मानवीय आत्यंतिक आत्महिताच्या,
सज्जनासि गमलीं अनुकूल तींच कीं,
कार्यें त्यां धर्म्य अशीं मानिलीं, अणी
तदनुरूप अेकाचा ह्मणुनि जो ठरे
त्यां माझा भार असे अुचलिला मुदें
यथाशक्ति यथापरिस्थिति, न भंगितां
धरिलें तें व्रत कदापि किमपि ना भयें.
 सत्कुल; अव्यंग देह; परम दयाळू
जनक आणि जननी ती; त्याहुनीहि कीं
वात्सल्यें, पुण्यें, प्रतिपाळिता तसा
अग्रज, जो अग्रगण्य तापसांमध्यें;

---

१ दिवसः—अर्थात् हें जीवन. हा जन्म हाच याचा आरंभ आहे कीं केवळ रूपांतरः मरण हाच अंत आहे कीं केवळ तिरोधान हें कोणीं सांगावें ?

२ पंचागें भटट, पंडितः—अर्थात् स्मृति प्रभृतिग्रंथ, स्मृतिकार, तत्त्वज्ञानी ,–नैको ऋषिर्यस्यवचः प्रमाणम्.

मूर्त विनय अनुज असा; अद्वितीयसें
प्रेयांचें प्रेमपुण्य; धन्य आणि तें
ध्येय महत्, देई जें जीवनाप्रती
सार्थकत्व मनुजांच्या, काव्यमय करी
जें आयुःकालातें, पूत चरित्रा;
तप कांहीं, जप कांहीं, यश कांहीं तें,
कांहींशीं मान्यताहि शारदेचिया
राजसभेमाजी कविरत्नभूषिताः
चाखियले रस नाना; हुंगियले तें
शतभूजलवायुललित शत सुगंध कीं;
पंचाग्नीमाधिल तया प्रखर भाजत्या
अुत्तापापासुनि तों प्रीतिच्या मअू
स्निग्ध परिष्वंगापर्यंत सर्वही
शीतल, शीतोष्ण, अुष्ण, अनुभवीयले
कटिबंध[1] स्पर्श तसें; परिसिलें किती
स्वरशत, शतभाषा, शतगीति नवनवा
शतमंजुल कंठांतिल—आणि मृत्युच्या
शतकठोर कंठांतिल घोर लागल्या;
नानाजन, जानपदें, जातिविभिन्ना
देश किती, दृश्यें तीं, भूमिच्या महा—
संग्रहालयांत परिभ्रमत पाहिलीं.
सुरूप तें, सुरेख तें, सुललित तें असें

१ कटिबंध: —या शब्दावरील श्लेषार्थ हा त्या सर्व रूपकाचे मानासिक आणि भौतिक असे दोन अर्थ करीत आहे.

पाहियलें डोळ्यांनीं किमपि तरि जया
मृत्यो!, ते डोळे हे झाक तूं सुखें!
—झांकणेंचि आवश्यक जरि गमे तरी!
कीं सुरेख पाहियलें--किमपि परी तें!
प्रीति विफल: विरह चिरंतन! नवीं वयीं,
प्रौढ धुरंधरहि न जी शकति तोलण्या,
तीच धुरा भर अुन्हांत तोलणें घडे!
म्हणुनि असे अजुनी अपुरीच राहिली
खेळाची हौस हंसत चांदण्यामध्ये
या आयुष्याच्या मम! तरिहि जाणुनी
कीं न ययातीचीहि हौस पुरेशी
झाली जरि आयुष्याचाचि सर्व तो
नृपति करी खेळ अेक; आणि पाहुनी
अिच्छेच्या बीजा फळ भोग लागतां
अिच्छेचीं बीजेंची त्यांत फिरोनी;
आणी अनुभवुनी कीं अेक भुकेची
अेक जेवणानें जी तृप्ति जाहली
तृप्ति सहस्राच्याही भोजनामुळें
असते कीं तितुकीची आणि तशीची;
--मी दे तुज अनुमोदन संपवूं असा
हा जीवन लेख अिथें; पृष्ठि या; जरी
पृष्ठें जीं पुढलीं तीं मागल्या तया
पृष्ठांची असली पुनरुक्तिची तरी!

म्यां असतां दिवस नसे व्यर्थ गमविला
दिवसास्ताचेंहि ह्मणुनि दुःख ना मला:
--भीति अुद्यांची ही वा !! मृत्युच्या मृता
जरि असेल त्या अंधःकारलतेला
फुलत दुज्या[1] दिवसाचे फूल-तरीही
भीति न मज; कीं येथें पेरिलें अह्मीं
फुलत आणि फळत तेंच, कथिति ते, तिथें.
आणी मीं पेराया कष्टलों असे
बीजें कीं तीं तीं जीं निवडुनी दिलीं
त्यांनींची[2] अत्त्युतम ह्मणुनियां मला
पेरुं फलाशा विरहित. "तूं तसें जरी
वर्ततील समपरिस्थितींत अन्यही;
तरि लोकोन्नति- विनाश होय ना असें
वर्त:" तसेंची वर्तूं यत्न म्यां सदा
केला आबाल्य. 'जसें अन्य तुझ्याशीं
वागावें ह्मणुनि तुला वाटतें तसें
तूंहि वाग अन्याशीं' संतवचन[3] हें

१ दुज्या दिवसाचें फूल:—पुनर्जन्म: दुसरा जन्म असेल तर: तो कर्मफलाप्रमाणें असतो ही अुपपत्तिहि सत्य असली पाहिजे. ते पुनर्जन्मवादीच तसें ह्मणतात.

२ त्यांनींची:—नीतिशास्त्रज्ञांनीं, धर्मकारांनीं.

३ संतवचन:—हीं नीतिसूत्रें सर्व धर्मांचें सार ह्मणून पौर्वात्यच नव्हे तर कांट, मिल्ल, स्पेन्सर अित्यादि पाश्चात्य नीतिज्ञांनींहि सांगितलें आहे. तीं सार्वदेशिक आहेत.

मीं अनुपळिं पाळाया कष्टलों. अणी
जरि आपद्धर्म[1] सेव्य मानिले तरी
ते अितुक्यास्तवची कीं धर्मची स्वयें
ओपुनि दे आपत्तीच्याचि मज करीं !।
जैं हिरव्या गवताच्या गार गालिचा–
वरुनि दहापावलींच अंगणामधें
कारागारांत कधीं मीं फिरें, तधीं
आत्मौपम्यांत मुरत चित्त थिजोनी
कितिदां तरि चरण अकस्मात चालतां
स्तंभित होअूनि रहावेत घटिघटी.
कांहीं केल्याहि तया तरुण कोंवळ्या
गवताचे अंकुर दुखतील या भयें
पाय त्यावरि नये पडूंचि कीं पुढें.
हातींचा घांस कधीं हटुनि रहावा
हातींचीं, कीं जितुकीं त्यात शितें तीं
बीजेंची नव्हत काय ? खातसों अह्मीं
फळ तें तें भ्रूणघात ? अणि कधि कधीं
मज पडलें भय कीं मज वेड[2] लागलें !–
आत्मौपम्यास जअीं वर्तण्यात हें

१ धर्मः —धर्मच स्वतःच्या रक्षणासाठीं कधीं कधीं आपत् धर्माचें हत्यार अुपसतो.

२ वेड लागलें:—जें जे खाअूं जावे त्याचीं त्याची हत्या होते असें वाटून घांस गिळूंच नये. फळ हें भावी वृक्षाचा गर्भच होय जो जो नारळ आपण खातों तो तो अेक भ्रूण घातच होतो, असा विचार जों जों सूक्ष्म होअी तों तों जगणें अशक्य आणि अनीति वाटे, वेडावून गेल्यासारखें होअी.

मन माझें अनुमरतां मज पदोपदीं
मरणासम दुःख होय पाहूनीं जगीं
पूर्ण असंभवाहि तया आचरूं पुरें.
तरिहि यत्न म्यां केला: अज्ञतेमुळें
वा अशक्यतेमुळेंच पद कधीं जरी
स्खलित जाहलें असेल तरि असेल तें.
ह्मणुन भय अजाहिना. स्मशान भूमिचा
परतट प्रदेश जो अनोळखी तिथें
सुखकर प्रवास करवि जें असें असे
ओळखिचें पत्र अह्मा जवळ त्या स्वयें
भगवान् श्रीकृष्णाचें—श्रीमताम् गृहे;
शुचीनांच। वा गेहे योगिनामपि ।।
'कश्चित् कल्याणकृच्च तात दुर्गतिम्
नहि गच्छति'। नहि गच्छति सांगती अणी
ते निरीश्वर स्वभाववादिही मला;[1]
ह्मणुनि जरी सत्यचि जें वदति ते, जरी
स्वर्ग, नरक, जन्मांतर, बंध, मुक्ति वा
निजकर्माचाची परिपाक कीं तरी
मरणाची वेस जयामाजि उघडते
त्या अदृष्ट नगरांतिल अति सुरम्य ते
राखवूनि ठेवियले असति बंगले

१ निरीश्वर वादी स्वभाववादी:—बुद्धासारखे; सांख्यासारखे; कर्मफलाचा, पुनर्जन्माचा सिद्धांत त्यांचा आणि सेश्वर वादी श्रीकृष्णादिकांचा ह्या पुरता अेकच आहे.

आधींची आम्हांस्तव भहनियां अम्हीं
कर्मांच्या, धर्मांच्या, नियत विसारा !
परि जरि कीं स्वर्ग, जीव, बंध, कर्म वा
ऐहिक तें इंद्रजाल मात्र, कीं जरी
संघातोत्पन्न भाव मात्र जीव हा
मृत्यु पृथक्करणिं अभावांत वोसरेः—
तरि सर्वोत्तमचि ! मरण अेक सुषुप्ति
अथवा प्रत्यक्ष मुक्ति ! पंचही असे
मिश्रित भूतांश पृथक् मुक्त होअुनी
विहरोत स्वेच्छ नव्या मिश्रणांतुनी,
वा स्वयेंचि, वा शून्यीं ! इंद्रधनु तसें
संझेच्या आकाशीं विपळ शोभुनी
विपळांतचि हा माझा 'मी' हि कीं जरी
विश्वाच्या अंतर्हित 'मीं' त मावळेः
तरि मरणा ! मरण न तूं ! मरण मुक्तिची !
—विपळांतचि परि ! विनंति अितुकिची असे !—
येणें तरि येअुनि जा झटकनी. तुझा
दुर्लौकिक जो जगांत, लोक जो तुझा
द्वेष करिति, तो न चि कीं असासि तूं स्वतः
निर्दय वा निंद्य म्हणुनि--पाहुनी तुला
आलाची कोणीही परत कीं न तो

---

१ अभावातः—चार्वाक किंवा आधुनिक positivist Compt, spenser, mill, Hackel, प्रभृति प्रत्यक्ष वादी तत्ववेत्ते म्हणतात तेंच खरें धरलें तरीहि चिंता नाहीं.

सांगूं तूं कैंवी तें !--परि विशेषतः
मृत्यो ! तूं आप्रियसा जगतिं जें तुझें
सैन्य, पुरस्सर, पीडक, हें हिडिस्ससें,
रोगाचें क्रूर असे, त्यामुळेंच कीं !
मीच न कीं परि अजातशत्रु जो जगीं,
तुल्य ज्या प्रियाप्रियादि हानि लाभ, त्या
भगवान् श्रीगौतमःप्रतीहि भासला
रोग जरा अप्रियचीः " लाभ ना दुजा
आरोग्यासम जगती " धर्मपद वदे.
तरिही जे कोणी तुज नुघडतीलची
स्वेच्छेनें दरवाजे, दुर्ग ते हठी
जिंकुं जीवनाचे तूं धाड धाडही
रोगांच्या सैन्याची गांजत्या तिथें.
मी तों जीं नुघडतील फोडिलीं तरी
जाणारचि, तीं दारें अवडुनि स्वयें
या माझ्या गेहाचीं, स्वागता असे
अनिवार्या सिद्ध तुझ्या ! म्हणुनि शक्य कीं
ये तरि, हे अखिल--वीर--वीर विजेत्या !
अकलाचि, अपुरस्सर, आणि अकस्मात्.

---

१ धर्मपदः --' नह्यारोगसमो लाभः संतुष्टिः परमं धनम् ' धर्मपद. समर्थांनांहि रोग अप्रिय होता. " देहीं चाले आरोग्यता । लाभ नाहीं त्या परता " असें ते म्हणतात !

परि अशक्य जरि तें तुज अेकटें तसें
येणेंची, तरि त्याही क्रूर पीडका
रोगाच्या सैन्याचा क्षोभ सोसण्या
मीं असेंचि सिद्ध ! आजि दोन वत्सरें
पाहतची असती तूं मजसि हा असा
शरपंजरिं खिळला ! ज्या मधुर लागलें
जीवनांतलें मधु, प्रकाश चक्षुतें,
प्रीति हृदा, तो मीं त्या सर्व सुखाचें
मूल्य म्हणुनि मृत्यूच्या यातनाहि कीं
समजुनि कर्तव्य सहूं सिद्ध असेची ! !



## २ हिंदु नृसिंह !

( चाल.—भूपती खरे ते वैभव. )

हे हिंदुशक्ति—संभूत—दीप्ततम--तेजा ॥
हे हिंदुतपस्या--पूत—ईश्वरी ओजा ॥
हे हिंदुश्री—सौभाग्य—भूतिच्या साजा ॥
हे हिंदुनृसिंहा प्रभो शिवाजी राजा ॥

चाल ब०-- करि हिंदु राष्ट्र हें तूतें ॥ वंदना ॥
करि अंतःकरणज तुज अभि नंदना ॥
तव चरणि भक्तिच्या चर्चा ॥ चंदना ॥
गूढाशा पुरवी त्या न कथूं शकतों ज्या ॥
हे हिंदुनृसिंहा प्रभो शिवाजी राजा ॥ १॥ ध्रु. ॥

॥ २ ॥

ह्या भग्न तट असे गडागडाचा आजी ॥
ह्या मग्न आज जयदुर्ग आसवां माजी ॥
ही भवानि[1]ची ह्या पुन्हां गंजली धारा ॥
ती ह्मणुनि भवानी[2] दे न कुणा आधारा ॥
चाल. व.-- गड कोट जंजिरे सारे ॥ भंगलें ॥
जाहलीं राजधान्यांचीं ॥ जंगलें ॥
परदास्य पराभवि सारीं ॥ मंगलें ॥
या जगतिं जगू ही आज गमतसे लज्जा ॥
हे हिंदुनृसिंहा प्रभो शिवाजी राजा ॥ २ ॥ ध्रु० ॥

॥ ३ ॥

जी शुद्धि हृदाची रामदास शिर डुलवी ॥
जी बुद्धि पांचशाहीस शत्रुच्या झुलवी ॥
जी युक्ति कूट नीतींत खलांसी बुडवी ॥
जी शक्ति बलोन्मत्तास पदतलीं तुडवी ॥
चाल व.-- ती शुद्धि हेतुची कर्मीं ॥ राहु दे ॥
ती बुद्धि भाबड्या जीवां ॥ लाहु दे ॥
ती शक्ति शोणिता माजी ॥ वाहु दे ॥
दे पुन्हा मंत्र तो दिलें समर्थे तुज ज्या ॥
हे हिंदुनृसिंहा प्रभो शिवाजी राजा ॥ ३ ॥ ध्रु० ॥

---

१ भवानीः—तलवार. २ भवानीः—भवानीदेवी.

# ३ जगन्नाथाचा रथोत्सव.

[ **परिचयः**—जगन्नाथाच्या रथाची मिरवणूक प्रतिवर्षी त्या विख्यात क्षेत्रीं निघते. त्या संकेतानें जी तात्विक घटना सुचविली जाते ती, या 'स्थलाच्या (दिग्विषतजांच्या) रथांत' बसून 'कालाच्या अतुट अतरणी' वर निघालेल्या त्या **जगन्नाथाच्या** महान् मिरवणुकीचीच घटना होय !

अव्यक्तापासून व्यक्ताकडे, निस्पंदांतून स्पंदाकडे, ही जी सर्वांतर्यामी ईश्वराची प्रभवाची मिरवणूक युगोयुगें चालत आली आहे ती कां केवळ गतीच्या आनंदाकरितांच ? For the mere delight of motion ? कां जिथून—ज्या अव्यक्तांतून—निघाली तिथेंच पुनः, व्यक्ताचा चक्कर मारून नुसती परत यावयास ? का या विकासाचें--उत्क्रांतीचें--ध्येय अनंत, सदा नवीन, असें रूपांतर आहे ? ही मिरवणूक 'दुज्या कुण्या दारीं जावया' निघाली आहे ? कां 'केवळ परतुनि येऊं परत निजागारीं'--मायेच्या व्यक्तींतून पुनः, प्रकृतीचा नाच संपला आणि ती तिरोधान पावली कीं, जेथून निघाली 'त्याच निजागारीं' परत येण्यासाठीं ?

रथास जसे पुढें ओढीत मध्येंच मागें खेंचून पुनः पुढें ओढण्याचा खेळ करतात तसे प्रभवामधून, उपप्रलयाकडे मध्येंच मागें खेंचीत, पुनः प्रभवाकडे त्या जगन्नाथाधिष्ठित मायेच्या प्रचंड मयरथाची ही जी मिरवणूक एकसारखी चालली आहे, तिचा हेतु अंतीं कुठें जाण्याचा आहे ? पूर्णापासून अपूर्णाच्या मार्गानें पुनः पूर्णाकडे ?--का अपूर्णातून कोणा अपूरणीय अशा अद्भुताद्भुत सदा नवीन अपूर्णाकडेच ?--कुठें ? कशासाठीं ? इतर कोणाला दाखविण्यासाठीं ? का स्वतःची करमणूक करण्याला स्वतःच पाहण्यासाठीं ? त्या अनन्य एकास पाहण्यास तरी अन्य दुसरा कोण येणार ? ]

———

# जगन्नाथाचा रथोत्सव.



### पद

ऐश्वर्ये भारी । या अशा । ऐश्वर्ये भारी ॥
महाराज आपुली कथा ना कुठें निघे स्वारी ॥ धृ० ॥

चाल : दिक्क्षितिजांचा दैदीप्य रथ तुझां सुटतां ।
ह्या कालपथाच्या अतुट अुतरणीवरता ।
नक्षत्रकणांचा अुठे धुराळा परता ।
युगक्रोश दूरी । मागुती । युग क्रोश दूरी ।
महाराज आपुली कथाना कुठें निघे स्वारी ? ॥ १ ॥

---

१ युगक्रोशः—ही जगंनाथाची मिरवणूक ज्या कालाच्या अुतरणविरून येत आहे त्या कालपथाचे युग हेच कोस होत ! तो सृष्टि विकासाचा रथ घडघड पुढें जातो तसा मार्गावर चुरडून अुचळून गेलेल्या नक्षत्रमालिकांचा धुराळा मागें अुठत आहे.

( २ )

पुसूं नयेचि परी । पुसतसें । पुसूं नयेचि परी ।
मिरवणूक ही किमर्थ अथवा कुठें निघे सारी ॥
दुज्या कुण्या द्वारीं । जावया । दुज्या कुण्या द्वारीं ।
किंवा केवल मिरवत येअूं परत निजागारीं ॥

**चाल :** ह्या सूर्यशतांच्या किती मशाली जळती ।
मधुनींच शतावधि चंद्रजोति[1] ह्या अुडती ।
सरसरत बाण[2] हे धूमकेतुचे सुटती ।
कितिदां आणि तरी । ह्रीहितें । कितिदां आणि तरी ।
अुठे चमकुनी रात्रि पुरातन[3] तिच्या अंधकारीं ॥ २ ॥

---

१ चंद्रज्योतिः —दारू कामांतील; ( श्लेषानें निरनिराळ्या सूर्य मालांतील चंद्र; आज प्रकाशणारे आणि कालेंकरून मागमूसदेखील अुरूं नये असे चंद्रज्योतीसारखे विझून जाणारे जे चंद्र त्यांच्या ज्योति.

२ बाणः—दारूकामांतील बाण.

३ रात्रि पुरातनः —मूल रात्रिः म्हा रात्री' आसीदिदं तमो मूढं.....प्रसुप्तमिव सर्वशः ' किंवा भौतिक शास्त्रदृष्ट्या जड द्रव्य ( matter ) विकास ( Evolution ) घेतां घेता त्यांतच चेतना, जाणीव, स्फुरूं लागते–अुठे ' चमकुनी ! ' पुनः तो संघात पृथक् होतांच जाणीव, ज्योत, नष्ट होअून जड मागें अुरतें.

३

जीवाचीच किती । कथा या । जीवाचीच किती ॥
रथासी जगन्नाथ तुझ्या या ओढू जे झटती ॥
ज्वालामुखि पंक्ती । पासुनी । ज्वालामुखि पंक्ती ।
--मज्जापिंडापर्यंत प्रस्फुटिता जी जगतीं ॥
अुंच निंच पाठीं । पुढति वा । अुंच निंच पाठीं ।
गति[1] तितुकी तव रथा झटतसे ओढायासाठीं ॥

**चालः**--अिच्छांत आणि या भूतमात्र वेगांच्या ।
ओवूनि लगामा तुझ्या परम[2]-अिच्छेच्या ।
त्या अतुट अुतरणीवरति अहो काळाच्या ।
खेळत हा अतलीं[3] । रथोत्सव । खेळत हा अतलीं ।
महाराज आपुली कथाना कुठें निघे स्वारी ? ॥ ३ ॥

---

१ गतिः--जगन्नाथाचा रथ ओढण्यास प्रत्यक्ष 'गती' च घोडा झाली आहे. मज्जापिंडांतील रसामध्यें जें स्पंदन होअून भावभावना प्रकट होतात त्या स्पंदनापासून तों जडांतील भौतिक गतींपर्यंत-सर्व-स्फोट--विकास--'प्रगति'--ह्या जगन्नाथाच्या महान् मिरवणुकीस पुढें नेत आहेत.

२ परम अिच्छेच्या:--ह्या सर्व भूतमात्राच्या, वस्तुजाताच्या वेगांत अीश्वरेच्छेचा परमप्रवृत्तीचा, रश्मी ओंवलेला आहे--जसा घोड्याच्या वरवर स्वैच्छ दिसणाऱ्या वेगांत धन्याच्या अिच्छेप्रमाणें हलणारा लगाम गोंवलेला असतो.

३ अतलीं:--ज्याला तळ नाहीं, धर नाहीं, अशा पथानें. निर्हेतुक--निरावलंबी--अित्यादि तात्विक संदर्भहि त्या शब्दानें ध्वनित होतातच.

# अनंताची आरती.



निरंजनासी निरांजनाचा देवा दीप तुला ।
दाविती । देवा दीप तुला ॥ धृ० ॥

आकाशाच्या अंगणांत तव
सूर्यसहस्रीं जो दीपोत्सव
पाजळिती हे पंथी अपुली त्यास करूं साजरा ।
दाविती, देवा दीप तुला ॥ १ ॥

सूर्यसहस्रींही जो उरला
पंथीनेंची जाळी स्फुरला
नयनीं ऐसा अंधकार[१]लव आहे तोचि भला ।
दाविती, देवा दीप तुला ॥ २ ॥

आओिच्याची बागेमधुनी
ताजींताजीं वेंचुनि वेंचुनी
मुली गुंफिती आओिच्याची वेणींतूनि फुलां ।
दाविती, देवा दीप तुला ॥ ३ ॥



---

१ भाविक भक्ति.

# परिशिष्ट.

# वैनायकवृत्ताचा विशेष.

(लेखकः - बॅ. सावरकर.)

साधारणतः असें ह्मणं या कीं तालसूरांचे संस्कार नसलेलें जें लिखाण वा भाषण तें गद्य. वरील संस्कारांचा, निदान तालाचा संस्कार, ज्यावर झालेला आहे तें पद्य.

आपले विचार अगदीं मनांत उठतात त्या शब्दांतच स्पष्ट आणि विस्तारशः व्यक्तविण्याचें साधन झटलें ह्मणजे गद्यच होय. परंतु तेच विचार तालसुरावर, ह्मणजेच पद्यांत, व्यक्तविले गेल्यास आपणांस दुहेरी समाधान होतें; त्या विचारास शब्दांत व्यक्तविण्यानें मनाचें आणि शब्दांस तालसुराच्या मंजुलतेची जोड लाभल्यानें श्रुतीचें. या श्रुतिमंजुलतेची जोड आपणाला इतकी हवीशी असते कीं अगदीं नीरस वाक्येंही तालसुरांत झटलीं जाताच वाटतीं त्याहून सरस वाटूं लागतात. तिश्रीपाढे ह्मणजे कोण रुक्ष प्रकरण; पण मुलांमुलींच्या शाळेंतील वर्गाचावर्ग जोडीजोडीनें जेव्हां तेच पाढे तालसुरांत ह्मणूं लागतो तेव्हां तो 'परवाचा' अगदीं ऐकावासा वाटूं लागतो. त्यांच्यांत मिसळून त्या चालीवर ह्मणावासा देखील वाटूं लागतो! यामुळेंच अगदीं निर्भेळ गद्य बोलता बोलता हरदास पुराणीक मधेंच रंगांत आले कीं तेंच गद्य कसल्यातरी गळ्यावर बोलूं लागतात. कांहीं वक्तेही एक प्रकारच्या सुरांत आणि ठेक्यांत आपल्या भाषणांतील भावनोद्दीपक गद्य वाक्यें उच्चारीत जातात. गद्यालाही गळा लावतात.

पण गळा झटला कीं कसल्यातरी सुराचें, तालाचें, चालीचें बंधन आलेंच. नुसत्या शब्दापेक्षां तालसुराच्या श्रुतिसुखदतेची गोडी असणाऱ्या शब्दांची मनुष्याला ही जी स्वाभाविकतःच अधिक आवड असते तीच पद्याचें मूळ आहे. त्या आवडीसाठीं मनुष्य गद्यांत असणारी वाटेल तसें बोलत जाण्याची सोय आपण होऊन सोडून देतो आणि तालसुराची बंधनें हौसेनें स्वीकारतो. पद्याचा आश्रय करतो.

ही गोष्ट झाली साध्या विचारांची, भावभावनांची. पण जेव्हां त्या भावभावना अगदीं अुत्कट होतात, अितक्या अधीर होतात कीं मुळीं शब्दांच्या आटोक्यांत राहूंच शकत नाहींत, तिथें गद्य कीं पद्य ही निवड करणेंच अशक्य होतें. हृदयाला दुर्धर वा दुस्सह झालेल्या भावभावनांचा आवेग स्पष्ट शब्दांच्या बिंदुबिंदूंनीं व्यक्त होण्याअितका जेव्हां अगा संयतच राहूं शकत नाहीं तेव्हां तो स्वयमेवच सुराच्या धाराप्रवाहांत वाहूं लागतो. गद्याचे तर नव्हेच नव्हे, पण शब्दमय पद्याचे आटोक्यांत न राहून गीतपदाच्या, गाण्याच्या, तानेच्या, ओघांत एहसाच सांपडतो सहज शब्दांत दुःख सांगणें हें गद्य. पण शब्दांत व्यक्त होअीतों तें दुःख न आवरतां येअून अकस्मात अनावर रडें कोसळतें तें पद्य, सहज गाणें. अनावर रोदन, अनावर हसूं, दबते अुसळणारे स्फुंदन, अकस्मात् वाजून जाणारी शीळ हीं सारीं सहज पद्येंच होत. आपण 'गळा काढून' रडतो, 'ताला' वर हंसतो, 'राहून राहून' हुंदके देतो. भावभावना आपली शब्दांत न समावणारी अुत्कटता व्यक्तविण्यास असा 'गळ्या' चा, 'ताला' चा, पद्याचा, स्वभावतःच आश्रय घेतात. किंबहुना शोकाचें आणि आनंदाचें हे रडगाणें आणि धिंगाणे हेंच मनुष्याचें पहिलें अुपजत गाणें: पद्य चें मूळ ! आणि त्यांचे तें अुसासे नी अुद्गार, हुंदके नी हसूं, हींच आद्यवृत्तें, अुपजत छंद ! आद्य कवीचे अनुष्टुप देखील त्यानंतरचे !

पद्याचा सूर, गीतांची 'तान', हा मनोवृत्तींच्या अशा आवेगाला संतत वेगानें वाहण्याचा पाट आहे. त्यांचा ओघ शब्दबंधाऱ्यास फोडून, ओसरेत ताणून ज्यांत वाहविला जातो तो सूर, ती तान. यासाठींच भावनेचा अुत्कट अुद्रेक स्वभावतःच पद्याचें रूप घेतो, गद्याचें नव्हे. म्हणूनच तान, ताल, सुरेलपणा हे पद्यांचे स्वाभाविक विशेष होत. आपण त्यांस पुढे जरी पद्याचीं 'बंधनें' म्हणतो तरी मुळाशीं पद्याचीं तीं अंगेंअुपांगेंच असतात. ज्यास अल्पस्वल्प तरी गळा वा चाल, सुरेलपणा वा ताल नाहीं तें पद्यच नव्हे. ज्या पद्याचा ताल सुटला त्याचा ताळच सुटला. जें गीत बेसूर, तेंचं भेसूर ! तें केवळ गद्य.

ज्यास असें कोणचेंही बंधन न पाळल्यानेंच आपल्या भावभावना व्यक्तविण्याची अिच्छा होते, त्यांतच त्या व्यक्तविल्याचें समाधान वाटतें, त्यानें

तशा तालतानेच्या, सुर बेसुराच्या, ' बंधनांचा ' आश्रय न घेतां सुचतील त्या शब्दांत त्यांस सुखेनैव 'व्यक्तवाव्य'; पण त्यास गद्य ह्मणावें. पद्याचा ज्यांत कोणताही विशेष नाहीं त्यास पद्य असें नुसतें ह्मटल्यानें कोणती विशेष शोभा येणार आहे !

काव्याचा आत्मा रस. तो गद्यांतही प्रतिभावान लेखकांस पुष्कळ प्रमाणांत साधता येतो. कांहीं छंदःशास्त्रज्ञ गद्यालाही ओक वृत्तच समजतात. कांहीं गद्य काव्यें कितीतरी रसाळ असतात ! आणि रस नसल्यामुळें नुसती " पद्य " ह्मणून ह्मणवून घेणाऱ्या कांहीं कविता कितीतरी नीरस असतात ! तेव्हां पूर्ण ' बंधन ' विरहित अशी काव्यरचना ज्यास करावयाची त्यानें गद्याचा आश्रय करावा. फारतर ठरीवसांच्याची वैय्याकरणी वाक्यरचनाही सोडून लिहिलेल्या या अशा गद्यास " स्वैरगद्य " ह्मणावें.

पण हीं बंधनें नसलेलें असें स्वैर पद्य मात्र होअूंच शकत नाहीं. किंबहुना पद्यांत हीं ' बंधनें ' बंधनें ह्मणून वाटतच नाहींत. वर दर्शविलेल्या भावभावनांच्या अुद्रेकाची स्वाभाविक प्रवृत्तीच तालांत, सुरांत; गळ्यावर व चालीवर, व्यक्त होण्याची असल्यामुळें त्यांचें जेव्हां पद्यावाचून समाधानच होत नाहीं तेव्हां त्यांना तीं बंधनेंच, आलिंगनाच्या बंधनासारखीं, गोड गोड वाटतात. हें बंधनच त्यांचा स्वैराचार असतो.

त्याच कारणासाठीं यमक, अनुप्रास, ध्वनि, प्रभृति शब्दालंकारांची आणि अर्थालंकारांची ' बंधनेंही ' कविता तशीच हौशीनें धारण करते कीं जशी कामिनी सोन्याचा कंबर पट्टा, मोत्यांचा हार, रत्नाच्या आंगठ्या, अंगावर घालते. हीं बधनें मन मोडणारीं बंधनें नव्हेत तर मनास येणारीं बंधनें असतात. तीं असणेंच अिष्ट वाटते. नसलीं तर चुकलेसें वाटतें. कवितेचें लावण्य त्यांनीं अधिकच खुलून दिसतें. कवितेवर कवी तीं बळानें लादीत नाहीं तर कविताच कवीपाशीं ते सुवर्ण अनुप्रासयमकादिक अलंकार मला वाला ह्मणून लाडिवाळ छंद धरीत सारखी विनवीत असते कीं " हौशीनें कस माझी गेंद छंद ! घडवा हो, बाजुबंद ! सख्या, घडवा हो बाजुबंद ! ! "

काव्याचा आत्मा जसा रस तसा पद्याचा आत्मा ताल, चाल. पुढें तालाची शास्त्रोक्त मीमांसा होअून मात्रांची श्रुतिशुद्ध मांडणी झाली. तिचाच पुढें निर्दोष प्रपंच वाढून आपली अनुष्टुप, अुपजाति, स्रग्धरा, भुजंग प्रयात आर्या गीति प्रभृति अनेक मंजुळ, बांधेसूत, आणि सुरेख वृत्तें घडलीं गेलीं.

ह्या वृत्तांना यमकही किती तरी खुलून दिसतो. संस्कृतांतील पूर्वींच्या वृत्तांस अनुप्रासादिकांची लेणीं असत. त्यांत पुढें यमकाचे लेणेंही जें लाभलें तें कलाविकासाचें चिन्ह होय, कलाऱ्हासाचें नव्हे. ओढून ताढून यमक साधणें हा कवीचा दोष, यमकांचा नव्हे. सुरेख यमक साधण्याची हातोटी नसल्या- मुळेंच निर्यमक कविता करणारांनीं आपल्या भाषादारिद्याचें नावानें बोटें मोडावीं, यमकांच्या नांवानें नव्हे !

आपलीं हीं अनुष्टुप, आर्यागीति, श्लोक, प्रभृति दोन चरणी चारचरणी वृत्तें सुटसुटीत, वेंचक, आणि चिमुकल्या भावभावनांस व्यक्तविण्यास अतिशय रसानुकूल आहेत. अेखादें सुभाषित, अेखादा अर्थान्तरन्यास, अेखादी अुपमा, किंवा अेखादें काव्यचित्र या रेखीव वृत्तांच्या चार चरणीं चौकटींत किती किती खुलून दिसतें ह्मणून सांगावें ! अगदीं आद्य कवींचें हें सुप्रसन्न अनुष्टुप पहाः

अिदं तीर्थं समं सौम्यं सुजलं सूक्ष्म वालुकम्
रमणीयं प्रसन्नंच सज्जनानां मनोयथा ! !

किंवा कालिदासीय कल्पनांच्या सोनेरी सांखळींत रत्नाच्या अेकाच लोलका सारखा लटकणारा हा अर्थांतरन्यास पहाः

सरसिजमनुविद्धं शैवलेनापिरम्यं
मलिनमपि हिमांशोर्लक्ष्म लक्ष्मीं तनोति
अियमधिकमनोज्ञा वल्कलेनापि तन्वी
किमिवहि मधुराणाम् मंडनं नाकृतीनाम् !

किंवा भवभूतीचें हें चिमुकलें काव्यचित्र पहाः—

दृष्टि स्तृणीकृत जगत्रय सत्वसारा
धीरोन्नता नमयतीव गतिर्धरित्रीम्
कौमारकेऽपि गिरिवद् गुरुताम् दधानो
वीरोरसो किमयमेत्युत दर्प अेव !

ह्यांतील मनोज्ञ प्रतिभा नुसत्या गद्याच्या 'वल्कलेनादि' रम्य भासलीच असती. पण ह्या सुललित, श्रुतिशुद्ध नी सुमंजुल वृत्तांचें अंगास ठीकठाक

होणारें हें जरीचें गुलाबी पातळ नेसल्यानें त्यांत तेंच तीचें लावण्य किती खुलून दिसत आहे ! कल्पनेचें तें सौंदर्य, वृत्ताचें तें रेखीव सुरेलपण, ताल-मात्रांची ती सुपरिष्कृत श्रुतिमंजुलता ! खरोखर, कविता असावी तर अशी असावी !

अशी कविता जितक्या सुबकपणें ज्या आपल्या ह्या संस्कृतवृत्तांत विलसू शकते त्या वृत्तांची गोडी ज्यास लागत नाहीं तो कसला रसिक ! ज्यास तीं साधत नाहींत तो कसला कवि !

दोन किंवा चार चरणांतच संपणारी एकादी सुटसुटीत कल्पना व्यक्त-विण्यास हीं वृत्तें आणि हे यमक हींच अशीं अगदीं अनुरूप आणि समुचित साधनें आहेत जितकेंच नव्हे, तर दीर्घकाव्यासही तीं अगदींच वावडीं आहेत असेंही ह्मणतां येणार नाहीं. ज्या अनुष्टुपांत जगांतील आद्यकाव्य- तें रामायण- गायलें गेलें आणि जगांतील महाकाव्य,-तें महाभारत रचलें गेलें, तें अनुष्टुप दीर्घ काव्यप्रबंधास जुळतच नाहीं, शोभतच नाहीं, असें कोणी कोणच्या तोंडानें ह्मणावें ! त्या वाल्मीकीच्या पवित्र आश्रमांत ज्या कोण्या प्राचीन उषःकालीं " ततः प्राचेतसप्रज्ञौ रामायणमितस्ततः। मैथिलेयौ कुशलवौ जगतुर्गुरु-चोदितौ " त्या प्राचीन उषःकालापासून आज युगानुयुगें ते त्या रामायणीय अनुष्टुपांचे मंजुल छंद काळाच्या बोलघुमटांतून निनादत येत आज जे द्या दोन्ही गोलार्धांवरील अवघ्या मनुजजातींस मोहून टाकीत आहेत ते कांहीं उगीच नव्हेत !

मराठी ओवी किंवा बंगाली पायर हींही त्या अनुष्टुप छंदाचीच एक सयमक नी शिथिल अशी प्राकृत आवृत्ति आहे. ज्ञानेशाच्या ओवीची रसानु-कूलता काय सांगावयास हवी !

हें सर्व विवेचन आरंभींच करण्याचा मुख्य हेतु जितकाच कीं यमक,ठरीव चरणांचे पद्यबंध,गेय चाली,प्रभृति जे विशेष आपल्या ह्या सुपरिचित जुन्या वृत्तांत आहेत त्यांपैकीं कांहीं आह्मी योजलेल्या या नव्या वैनायक वृत्तांत जरी गाळले असले आणि ते गाळल्यामुळें हें वृत्त सुदीर्घकाव्यरचनेस कांहीं प्रमाणांत अधिक सोयीचें होतें असें आह्मास जरी वाटत असलें तरी त्यावरून वरील यमकादिक विशेष आणि त्यांनीं युक्त असणारीं तीं द्विचरणी वा चार चरणी जुनीं वृत्तें मुळीं रसानुकूल नाहींतच किंवा त्यांत दीर्घकाव्यें मुळींच खुलून दिसत नाहींत

किंवा हें नवीन वृत्त त्या वृत्तांहून सर्व प्रकरणीं वा सर्वतोपरी अधिक सरस आहेच आहे, असें कांहींतरी आह्मी समजत आहों असें कोणास वाटूं नये. वरील वृत्तांच्या लहान घडीव फुलपात्राहून या वैनायक वृत्ताचें विस्तृत आणि वहात्या महान ओघांचें हें वृत्तपात्र दीर्घकाव्यबंधाच्या प्रवाहास अधिक 'अनुकूल' झाल्यास होअील अशा अपेक्षेनें केलेला तो अेक प्रयोग आहे. जुन्या वृत्तांतही, नव्हे निर्भेळ गद्यांतही, त्यांच्या विविध आकाराप्रकारांप्रमाणें ज्यांचे त्यांचे निराळे सौंदर्यविशेष प्रत्येकीं आहेतच. त्या वृत्तांमध्यें स्वतःचेही कांहीं सौंदर्यविशेष असणाऱ्या ह्या अेका नव्या वृताची वांच्छनीय भर पडली असतां आपल्या वृत्तसंपत्तीची विविधता थोडी फार वाढणारीच आहे, अितकेंच या वृत्ताच्या वतीनें ह्मणणें.

गद्यपद्यकाव्यांच्या रचनेसंबंधीं प्रस्तुत विषयास लागू असलेलें तेवढें सामान्य विवेचन वर केल्यानंतर आतां या वृत्तांचे ते विशेष गुण वा अुपयोग काय आहेत तें थोडक्यांत पाहूं.

( १ ) गद्याला तालयतियमकचरणसंख्या प्रभृति बंधनें नसतात, परंतु त्यामुळें त्यांत सुरेलपणा येत नाहीं. तालयति अित्यादि संस्कारांनीं वाणीस सुरेलपणाची, मनोहर मंजुलपणाची जोड ज्यांत देण्यांत येतें तें पद्य. वैनायक वृत्तावर तालयति प्रभृति संस्कार होत असल्यानें त्यास मंजुळ सुरेलपणाची जोड मिळूं शकते. यास्तव तें गद्य नसून पद्य होय.

( २ ) गद्याची पुढील आणि पद्याची पहिली पायरी ह्मणजे अक्षर-संख्याक वृत्त. वृत्तकलाविकासाची त्याच्याही पुढील पायरी मात्रासंख्याकवृत्त. कारण तालाच्या मात्रा ठराविक पडल्या तरच तो चांगला साधतो. पण ऱ्हस्व-दीर्घांचा भेद न करतां त्या तालात नुसती संख्या मोजून अक्षरें भरलीं तर त्यांचा अुच्चार अशुद्धपणें केल्यावाचून त्या तालाच्या ठराविक मात्रांत तीं समावता येत नाहींत. अभंगादि अक्षर वृत्तांत या अडचणीमुळेंच पांडुरंग शब्द अनेकवेळा " पाडु ऽऽ रंग " असा लांबवावा लागतो किंवा 'बेलाचें फूल माझ्या महादेवाला' यासारख्या ठिकाणीं दीर्घअक्षरें झपकन अुच्चारून आग-गाडीचे डब्यांत दडपून प्रवासी कोंबावे तशीं त्या तालांत तीं कोंबावीं लागतात. बंगाल्यांत अक्षर वृत्तेंच बहुत. परंतु त्यांतीलही अव्यवस्था रवीन्द्रबाबूसारख्या संस्कृतश्रुतिसंपन्न कवीला पुढें पुढें अितकी कर्कश भासूं लागली कीं, त्यानीं

आपली कांहीं कांहीं जुनी अक्षर–संख्याक कविता शास्त्रशुद्ध अशा मात्रा-संख्याक स्वरूपांत वृत्तांतरीतही केली आहे. हिंदींतही आतांशी मात्रा संख्याक वृत्तेंच शिष्टतर समजतात. जो ताल असेल त्याच्या मोजून ठरविलेल्या मात्रां अितक्याच शास्त्रशुद्ध ऱ्हस्व दीर्घ अुच्चार केले असतां ज्यांच्या मात्रा भरतात तितकींच अक्षरें योजणें हेंच प्रशस्त. यासाठींच मात्रासंख्याक वृत्तें हीं अक्षर संख्याकांपेक्षां कलाविकासाची पुढची पायरी होय. वैनायक वृत्तही अक्षर संख्याक नसून मात्रा संख्याक असल्यामुळें तें केवळ गद्याहूनच नव्हे तर अक्षरसंख्याक पद्यांहूनही श्रुतिशुद्ध, सुरेल आणि मंजूळ होअूं शकतें. बंगालींतील ' अमित्राक्षर छंद ' अक्षरसंख्याक असतांही याच कारणामुळें त्याचें त्या प्रकरणीं अनुकरण न करतां मराठी कवितेचा शास्त्रशुद्ध असा मात्रा संख्याक संस्कारच आम्ही वैनायक वृत्तावर केला.

(३) जुन्या वृत्तांत बहुधा चार चरणांचा वा दोन चरणांचा पद्यबंध असतो आणि त्यांचे शेवटीं विचार आणि वाक्य पूर्ण करून विसावा घ्यावा लागतो. यामुळें जो विचार त्यांच्या त्या लहान संपुष्टांत समावणारा नसतो किंवा ज्या वाक्याची झेप त्यांच्या आटोक्याबाहेर जाण्याअितकी विस्तृत असते ते विचार नि वाक्यें त्यांत मावत नाहींत, त्यांची शोभा त्या वृत्तांतील काव्यास लाभत नाहीं. या अडचणीसाठीं अशीं विस्तृत वाक्यें आणि विचार व्यक्तविण्याचें कार्य त्याच त्या वृत्ताची पुनरावृत्ती करून संस्कृतमध्यें कुठें कुठं साधलें जाअी. अशा अेकाधिक श्लोकबंधास संस्कृतमध्यें " कुलक " असें ह्मणतात. कुमार-संभवांत दहा पंधरा श्लोक मिळून झालेल्या अशा अेका कुलकांत कालिदासानें असें अेक विस्तृत वाक्य आणि अनेक कल्पनांची गोड गुंफण असलेला विचार व्यक्तविला आहे हें प्रसिद्धच आहे. परंतु ठराविक चालीचें तेंच तें वृत्त सारखें ह्मणावें लागल्यानें अशा प्रबंधात लवकरच अेकसुरीपणा ( Monotony ) येअूं लागून श्रुतिला शीण वाटूं लागतो. विस्तृत काव्यें अेकाच अनुष्टुप, ओवी, प्रभृति अशा लहान वृत्तांची सहस्र सहस्र वार पुनरुक्ति करून लिहावीं लागतात तेव्हां तर हा अेकसुरीपणा फारच नडतो. ही अडचण टाळ-ण्याची दुसरी युक्ति ह्मणजे चंदभाटाच्या प्रख्यात " पृथ्वीराजरासो " सारख्या किंवा रघुनाथ पंडितांच्या नलदमयंति काव्याप्रमाणें विविधवृत्तें अेकापाठीमागून अेक योजणें. यामुळें ही अडचण पुष्कळ अंशीं दूर होते आणि अेकसुरीपणा

चांगलाच आळा घालतां येतो. परंतु त्या प्रत्येक वृत्ताचें पहिलें चरण ज्या चालींत त्याच चालींत शेवटच्या चरणापर्यंत तरी गळा तोच धरावा लागत असल्यानें भावभावनांच्या अनुरोधें वाक्यांचा स्वर झटपट पावा तसा बदलता येत नाहीं हें अेक, आणि दुसरें वैगुण्य असें कीं त्या साऱ्या वृत्तांत प्रत्येकीं दोन वा चार चरणान्तीं विचारांचा आणि वाक्याचा अंत करून विराम देणें भाग पडत असल्यामुळें विस्तृत वाक्यांची वा विचारांची अशा काव्यांस शोभा येत नाहीं ती नाहींच. अशा रीतीनें कुलक किंवा वृत्त विविधता या अुपायांनीं अेकसुरीपणा शक्य तों टाळून, विचार वाक्यांची सुविशाल झेप समाविण्याची सोय या प्रत्येकीं अेक चाली, लहान चरणी, शीघ्रविरामी असलेल्या गेय वृत्तांत व्हावी तशी होत नाहीं. यावर अुपाय म्हणूनच अिंग्लिशमध्यें Blank verse ची योजना करण्यांत आली. त्यामुळें ती सोय पुष्कळ अंशीं अधिक चांगल्या प्रकारें करतां येअूं लागली. त्याचसाठीं वैनायक वृत्तासही दोन वा चार वा दहा चरणांतींच विराम असावा असें कांहीं बंधन नाहीं. त्यामुळें विशाल विचार संपेतों विराम लांबविता येतो. अनेक लहान अुपवाक्यांनीं गुंफलेली वक्तृत्वपूर्ण दीर्घ वाक्यें, त्यांची गोड गुंफण वा गंभीर प्रवाह फारसा खंडू न देतां, त्यांत साधतां येतात. Paradise lost या मिल्टनच्या महाकाव्यांतील या Blank verse च्या वृत्तांत गुंफलेलीं सैतानाच्या राजसभेंतील किंवा अीश्वराच्या देवसभेंतील वक्तृत्वशाली भाषणें वाचलीं असतां हा लाभ अशा वृत्तानें कसा साधला जातो तें चटकन ध्यानांत येअील. तीच सोय वैनायक वृत्तांत तशीच साधतां येते.

(४) सयमकता हा जो बहुतेक मराठी वृत्तांचा निरपवाद नियम तो या वृत्तास केवळ विकल्पानें लागू आहे. यमकालंकार लहान चरणी वृत्तास खुलतो. मागच्या चरणाच्या शेवटच्या अक्षराची आठवण श्रुतींत गुंगत आहे तोंवर जर पुढच्या चरणान्ती तत्सदृश ध्वनी आला तर, अपेक्षित स्थलीं प्रिय मित्र अचुकपणें भेटावा, तसा श्रुतीला आणि मनाला आनंद होतो. म्हणूनच यमकाला मित्राक्षर असेंही नांव आहे. आणि Blank verse प्रमाणें मधुसूदन दत्तानीं केलेले वृत्त निर्यमक असल्यामुळेंच त्यांनीं त्यास ‘ अमित्राक्षर छंद’ हें नांव दिलें. पण मागच्या चरणाचा तो शब्द स्मृतींतून निघून जाअील अितक्या लांब अवधांनंतर पुढच्या कुठल्या तरी चरणांत यमक आला तर त्या योगें श्रुति मंजुलतेचा

आनंद सहसा अुत्पन्न होत नाहीं. असा दीर्घावधिनंतरचा यमक केवळ दृष्टीला दिसण्यानें कशी मंजुलता येणार ! कारण मंजुलता ही श्रुतिगम्य गुण; दृष्टिगम्य नव्हे ! वास्तव या वृत्तांत दोन तीन चरणांतच संपेल असा विचार जर आला नी त्या योगे अशा सन्निधच्या अंतरावरच विराम पडला तर यमक घालावयासही हरकत नाहीं. तो या वृत्तालाही अशा स्थलीं शोभतो. जसेः

शंभरदा प्रश्न अुठे रानटी स्वरीं
'होशी कां मुसलमान ? वांचशी तरी !'
शंभरदां अुत्तर दे कंप अंबरीं
'हिंदू मी ! शीख अम्ही ! मरण मी वरीं !'

परंतु मागच्या च्छेदकांत सांगितल्याप्रमाणें या वृत्तांत अनेक वळा अनेक लहान वाक्यें गुंफलेलें अेखादें मोठें वाक्य दहा पांच चरणांत प्रवाहत अर्थानुरोधें मधेंच कुठेंतरी संपते. त्या योगे तो विसावा लांब अंतरावर अेकाद्या सुदूर चरणामध्यें वा चरणान्ती पडल्या कारणानें सन्निध यमकानें साधणारी श्रुतिमंजुलता, तिथें मागच्या विसाव्याच्या अक्षरांची मित्राक्षरें घातलीं तरी, अुत्पन्न होत नाहीं. अशास्थलीं त्या दीर्घ वाक्याची आणि वक्तृत्वपूर्ण प्रवाही विचाराची शोभाच यमकाच्या दुय्यम शोभेहून अधिक रसानुकूल असल्यास यमक सोडून तीच साधणें अर्थ—सौंदर्यास अुपकारक होतें. अेतदर्थ हें वृत्त सयमक असलेंच पाहिजे असें बंधन त्यास घातलेलें नाहीं. पण ह्मणून तें निर्मयकच असावें असेंही नाही. यमकाची श्रुति मंजुलता अर्थ सौंदर्यास साधक वाटेल तिथें यमक साधतां येतो. नाहीं तथें यमकास गाळूनही श्रुतिमंजुलता केवळ कुशल अनुप्रासाच्या योजनेनें साधून अर्थसौंदर्यही अबाधित राखतां येते. याच कारणासाठीं अिंग्रजींतील Blank verse आणि त्याचें बंगालींतील अनुकरण ' अमित्राक्षर छंद ' ह्यांत यमक अपरिहार्य मानलेला नसतो. त्यांचेच अनुरोधें वैनायक वृत्तांतही ती सोय केली आहे.

(५) पण ह्या वर दिलेल्या कांहीं सोयींसाठीं त्या जुन्या वृत्तांत असणारी ' गेय ' तेची गोडी या वृत्तास सोडावी लागते. हें वृत्त गेय नसून पाठ्य,वाच्य, आहे. वास्तव ज्या कल्पना चिमुकल्या नी चटकदार किंवा जे विचार सुटसुटीत नी अेकेरी असतील ते ते यथारुचि त्या त्या जुन्या गेय आणि प्रासादिक

वृत्तांत वर्णावे. प्रवाही, भरदार, वक्तृत्वशील अशा भावभावनांच्या गुंफणीचा काव्यबंध, अेकसुरीपणा आणि त्रुटितपणा टाळून रचावयाची सोय या वैनायक वृत्तात त्यांतल्या त्यांत अधिक होत असल्यामुळें अशावेळीं यथारुचि या वृत्तास अवलंबावें.

(६) दीर्घवाक्याप्रमाणेंच लघुतम वाक्येंही या वृत्तांत ताल यति संभाळून कुशलपणें योजलीं असतां योजता येतात. अितकेंच नव्हे तर दुःखशोकाचे अुद्गारही जसेचेतसे आवेशानें वा अुद्वेगानें अुच्चारतां येतात. हें वृत्त पाठ्य असल्यामुळें गद्याप्रमाणें आवेश, अुद्वेग प्रभृतीचे रसानुसारी ध्वनी अितर गेय वृत्तापेक्षां अधिक सहज त्वरेनें बदलून या वृत्तांत ताल संभाळूनही व्यक्तवितां येतात आतां लहान तर लगेच विस्तृत अशा वाक्यरचनेंतून, आतां झुळझुळ तर आतां वेगवान, आतां करुण तर आतां संकुल, अशा या वृत्ताच्या अखंडित प्रवाहांत वाच्यांतील रसौघास यथारुचि विविध वळणें घेत अितर वृत्तांच्या प्रवाहापेक्षां अधिक सलीलतेनें वहात जाता येतें.

(७) हेंही येथेंच सांगून टाकलें पाहिजे कीं यद्यपि या वृत्तास अपरिहार्यपणें यमक, चरणसंख्या, गेयता अित्यादि बंधनें नसल्यामुळें त्यांत अेकसुरीपणा आणि त्रुटितपणा सापेक्षतः पुष्कळ प्रमाणांत टाळतां येतो तरीहि तेंही अेक वृत्त, अेक पद्य–प्रबंधच, असल्यानें त्यास अवश्य असणाऱ्या तालयति प्रभृति बंधनांचे योगानें ह्या वृत्तांस वाचण्याची, गेय नसली तरी पाठ्य अशी अेक पद्धत, लवचिक आणि लांब झेपेची कां होअीना पण अेक सुरेल चाल, ही आहेच. पण चाल, ताल, पद्धत, वा सुरेलपणा ह्मणजेच अेकसुरीपणा असें नव्हे: तर अेकाच सुराची प्रमाणाबाहेर कंटाळवाणी पुनरुक्ती, आवर्तन, ह्मणजे अेकसुरीपणा, आणि तो टाळणें ह्या वृत्तात असणाऱ्या वाक्यांची विविध वळण, ध्वनिपालट, चरणांची मोड, प्रभृति, वर दिलेल्या विशेष सोयींमुळें, अितर लहान, गेय आणि तुटक वृत्तांहून पुष्कळच अधिकप्रमाणांत शक्य होतें. अितकेंच काय तें ह्मणणें. blank verse वा अमित्राक्षर छंद ह्यांचीहि हीच गोष्ट. ताल वा सूर असा नावालाही नको असेल तर सुरेलपणाचा मोह आमूलात् सोडून देअून पद्याचा प्रश्नच न काढतां, निर्भेळ गद्याकडेच वळलें पाहिजे.

अर्थात्च हें वृत्त वाचण्याची ही विशेष पद्धत, कोणत्याही पद्याचे चालीप्रमाणें तिच्या नुसत्या वर्णनापेक्षां ती कशी तें ह्मणून दाखवूनच सांगतां

येणार आहे. तोंवर तें वृत्त कसेसें वाटणारच. त्यांतही नेहमीच्या परिचयाचा यमकाचा मनमिळाअू दाखलाही त्यापाशीं नसल्यानें त्याची ओळख करून घेणेंही अुद्वेजकच भासेल. अिंग्लीशमध्यें Blank verse हें निर्यमक वृत्त जेव्हां प्रथम रचले गेलें तेव्हां त्याचाही ह्याच कारणांसाठीं जिकडे तिकडे अव्हेर झाला. ‘ ओळी तोडून छापलेलें गद्य ’ असें त्यास हिणवले गेले. पण पुढें त्यांत रचलेले ते मिल्टनचे Paradise Lsost हेंच अिंग्रजींतील अुत्कृष्ट महाकाव्य ठरलें; आणि शेक्सपीअरला देखील नाटकें त्यांतच लिहावींशीं वाटलीं ! बंगालमध्यें तसें वृत्त योजून मधुसूदन दत्तानीं जेव्हां ‘ मेघनादवध ’ प्रथम लिहिला तेव्हां तर अशा वृत्ताची, त्यांच्या त्या ‘ अमित्राक्षर छंदाची, ’ त्या काळच्या वाचकांनीं नुसती रेवडी अुडवली. त्याच्यावर कित्येक विडंबनेंही लिहिलीं गेलीं; पण त्याची ह्मणण्याची बिनचुक घाटणी लोकांचें तोंडीं बसत गेली तशी त्याची चव लागत गेली आणि आज तें वृत्त अर्वाचीन बंगाली कवितेच्या गळ्यातील ताअीत होअून बसला आहे. रवीन्द्र बाबूंनींसुद्धा आपली नाट्यकाव्येंच नव्हत तर आपलीं कित्येक भावगीतेंही त्यातच रचीलीं आहेत. हें वैनायक वृत्त हाही त्याच दिशेचा अेक प्रयोग आहे. तो प्रथम मराठींत असला तरी हिंदी बंगालीतही अशा वृत्ताची वाण असल्यानें त्यांसही त्याचें काय होतें तें लागू पडणारें आहे. प्रयोगच तो ! झाला यशस्वी तर ठीकच. न झाला तरीहि ठीकच. कारण हा अमका प्रयोग अमक्या कारणासाठीं जमत नाहीं हे सिद्ध होणें हेहि त्या प्रयोगाचीच अेक सिद्धि आहे, अुपयुक्तता आहे !

